






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनन्द काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002 संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनन्द काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051 स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट - 95459 50808 विजय पाध्ये - 098220 31963.** marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** -

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | **₹ १५०/-** | **₹ ४००/-** | **₹ ७००/-** |
| **संस्था :** | **₹ २००/-** | **₹ ५५०/-** | **₹ ९००/-** |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/-+ नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान **₹ २,५००/-**, अर्धे पान **₹ १,५००/-**, पाव पान **₹ ८००/-** शुभेच्छा **₹ ४००/-**, आवरण पृष्ठ तीन **₹ ३,०००/-** जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

## अनुक्रमणिका

## १ : पाध्ये विश्वस्तनिधीतर्फे देणगी

मराठी अभ्यास परिषदेच्या 'भाषा आणि जीवन' या नियतकालिकाला प्रभाकर व कमल पाध्ये विश्वस्तनिधीतर्फे ( ₹ ५०,०००/-) पन्नास हजार रुपयांची देणगी देण्यात आली आहे. त्याबद्दल परिषद त्यांची ऋणी आहे. देणगीसोबत दिलेले पत्र वाचकांच्या माहितीसाठी येथे देत आहोत.

सदा डुम्बरे
इंद्रायणी, पत्रकारनगर, पुणे १६.
३ एप्रिल, २०१३

श्रीमती नीलिमा गुंडी
संपादक, भाषा आणि जीवन
स०न०वि०वि०

गेल्या शतकातील महाराष्ट्रातील आघाडीचे पत्रकार, साहित्यिक, समीक्षक व सौंदर्यमीमांसक प्रभाकर पाध्ये व त्यांच्या समाजकार्यकर्त्या पत्नी कमल पाध्ये यांनी स्थापन केलेल्या 'प्रभाकर आणि कमल पाध्ये विश्वस्तनिधी'तर्फे गेली काही वर्षे मराठीतील वाङ्मयीन, शैक्षणिक आणि समाजसेवेशी संबंधित उपक्रमांना आर्थिक साहाय्य केले जाते.

मराठी अभ्यास परिषदेतर्फे प्रकाशित होणाऱ्या 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाची निवड या वर्षातील आर्थिक साहाय्यासाठी करण्यात आली आहे. गेली तीस वर्षे सातत्याने भाषेशी आणि प्राधान्याने मराठी भाषेशी संबंधित विविध अंगांचा ज्या साक्षेपाने आपण विचारविमर्ष करीत आहात त्यामुळे वाचकांच्या व अभ्यासकांच्या भाषाविषयक जाणिवा अधिक विकसित होण्यास मदत झाली आहे. केवळ भाषाविषयाला वाहिलेले हे मराठीतील एकमेव नियतकालिक असावे. जागतिकीकरणाच्या प्रभावामुळे इंग्रजीच्या तुलनेत भारतीय भाषांना मिळणारे दुय्यमत्व लक्षात घेता मराठी भाषेच्या विविध पैलूंवर अभ्यासपूर्ण चर्चेसाठी अभ्यासकांना एक स्वायत्त व्यासपीठ असण्याची निकड वाढली आहे. 'भाषा आणि जीवन'मुळे ही गरज अंशतः पूर्ण होऊ शकेल ही अपेक्षा अवास्तव ठरणार नाही.

आपल्या कार्यासाठी मनःपूर्वक शुभेच्छा.

सस्नेह,

**सदा डुम्बरे**, (विश्वस्त, प्रभाकर आणि कमल पाध्ये विश्वस्तनिधी)

---

## २ : देणगी

श्री० अशोक जोशी, बोरीवली यांनी मराठी अभ्यास परिषदेला ₹ १०,०००/- देणगी दिली आहे. परिषद त्यांची ऋणी आहे.

संपादकीय

# जीव घाबरा करणारी नवोदित भाषा

विजय पाध्ये

*('जीव घाबरा करणारी भाषा' ह्या शीर्षकाचा डॉ० मॅक्सीन बर्नसन ह्यांचा एक लेख पूर्वी 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध झाला होता. त्या घटनेला बरीच वर्षे होऊन गेली आणि दरम्यान काळाबरोबर संदर्भही बदलले, परंतु भाषेमुळे गडबड-गोंधळ होणे चालूच राहिले. अलीकडेच उदयाला आलेल्या एका वेगळ्या प्रकारच्या भाषेतून उद्‌भवत असलेला गोंधळ जाणवला आणि त्यामुळे डॉ० बर्नसन ह्यांच्या त्या लेखाची आठवण झाली. म्हणूनच ह्या लेखाचे शीर्षक बऱ्याच अंशी तेच ठेवून ह्या नवोदित भाषेविषयी टिपणी केली आहे.)*

'ता'वरून ताकभात असा अर्थ लावणे सोपे असले तरी c hw dey :-* & cort! Signior Lucentio, hEr iz my h&, & hEr I frnly vow ह्याचा अर्थ काय ते कुणी सांगू शकेल? अर्थातच, ह्या प्रश्नाच्या उत्तराची अपेक्षा नाही, कारण एखाद्या पट्टीच्या ट्विटहॉलिकाच्या किंवा ट्विडिक्टाच्या मदतीशिवाय कुणालाही असला मजकूर समजणं शक्यच नाही. (वस्तुत: ट्विटहॉलिक, ट्विडिक्ट हे शब्ददेखील सर्वसामान्यांच्या आकलनापलीकडचे आहेत हे माहीत आहे, तरीदेखील इथे ते मुद्दाम वापरले आहेत.) फार तर Signior Lucentio ह्या दोन शब्दांवरून, इंग्लिश वाङ्मयाच्या आणि विशेष करून शेक्सपीअरच्या साहित्यकृतींच्या अभ्यासकांनाच हे वाक्य 'टेमिंग ऑफ द श्रू'मधले See, how they kiss and court! Signior Lucentio, Here is my hand, and here I firmly vow आहे असे सांगता येईल.

ही आहे ट्विटरवरची भाषा. मॅक्सीन बर्नसनमावशींप्रमाणेच अनेकांचा जीव घाबरा करून टाकणारी आणखी एक भाषा. मोबाईल फोनवरून लघुसंदेश (एसएमएस) पाठवण्यासाठी लोक - विशेष करून तरुण वर्ग Bcoz, B4, Gr8 u r! Thx, OMG, CU अशांसारखे त्रोटक अक्षरांचे तथाकथित शब्द, वाक्ये वापरू लागला, तेव्हापासून द०भि० कुलकर्णी ह्यांच्यासारखे भाषेविषयी संवेदनशीलता बाळगून असलेले साहित्यिक, विचारवंत गडबडून गेले (पाहा: 'शब्दसंक्षेप, वाक्यसंक्षेप', 'भाषा आणि जीवन', दिवाळी २००८.) असली त्रोटक भाषा अनाकलनीय असल्याबद्दल तक्रारी करू लागले. परंतु त्या तक्रारींकडे दुर्लक्ष करीत नवीन पिढीनं आपली भाषा नेटानं पुढे चालू

ठेवली आणि तेवढेच नव्हे तर ऑर्कुट, फेसबुक, ट्विटर ह्यांसारखी नवनवीन संवाद-माध्यमे उपलब्ध होऊ लागली तशी ती भाषा अधिकाधिक प्रभावी करीत राहून भाषावेत्त्यांपुढे आव्हानच उभे केले! पाहता पाहता ही भाषा इतकी रूढ होऊन गेली आहे की एरव्हीच्या लेखनातही मूळ शब्दांच्या स्पेलिंगांचा विसर पडून नव्याने रूढ झालेले शब्द सर्रास वापरात आले आहेत. नजीकच्या काळात, विद्यार्थ्यांच्या उत्तरपत्रिकांमध्ये इंग्लिशमधले लेखन हे असले नवजात शब्द किंवा वाक्यरचना असलेले तपासताना आढळले, तर विद्यार्थ्यांचे गुण कमी करू नयेत असे परीक्षा मंडळाकडून आदेश निघाले तर आश्चर्य वाटायला नको!

ह्या नव्याने उदयाला आलेल्या भाषेचा जन्म एका तांत्रिक अपरिहार्यतेतून झाला आहे. आपले विचार दुसऱ्यांपाशी मांडताना वर्णसंख्या मर्यादित म्हणजे १४०पेक्षा अधिक असता कामा नये एवढी अट पाळली म्हणजे झाले! आधीच लोकांना लांबलचक स्पेलिंग असलेल्या इंग्लिश शब्दांचे वावडे! त्यामुळेच तर पेरॅम्ब्युलेटरऐवजी प्रॅम, रिव्हॉल्युशनरीऐवजी रेव्ह, डॉक्टरऐवजी डॉक, लॅव्हेटरीऐवजी लू, बायसिकलऐवजी बाईक, मायक्रोफोनऐवजी माईक असे संक्षिप्त शब्द तयार होऊन सर्वमान्य झाले. पण तेवढ्याने कुठे भागतेय? म्हणून आणखी संक्षेप करण्याच्या गरजेपोटी त्या संक्षिप्त शब्दांचे आणखी संक्षेप झाले, TBH म्हणजे `टु बी ऑनेस्ट' आणि ICYMI म्हटले म्हणजे त्याचा अर्थ `इन केस यू मिस्ड इट' असा होतो हे पचनी पडू लागले; काही शब्दांचे, वाक्यांशांचे रूप बदलून त्याऐवजी केवळ एकदोन अक्षरे किंवा स्मायलीज, इमोटिकॉन्स ह्यांसारखी चित्ररूप चिन्हे प्रचारात आली. सरावाने तशी शब्दयोजना करणाऱ्यांना त्यांतील ध्वनित अर्थ कळायला अडचण येत नव्हती, परंतु नवागतांसाठी किंवा चोखंदळ अभ्यासकांसाठी एसएमएसमध्ये वापरली जाणारी संक्षिप्त रूपे, ट्विटरमध्ये वापरली जाणारी संक्षिप्त शब्दरचना, वाक्ये नीट समजून घेणे त्रासदायक होते. म्हणून मग शब्दकोशही उपलब्ध झाले. ट्विटरवरील लोकांना डिक्शनरीपेक्षा ट्विटनरी (Twittonary) सारखे महाजालावर सहज आणि विनामूल्य मिळणारे कोश आज अधिक उपयोगाचे व मोलाचे वाटतात. तिथे idiot, sweetheartसारख्या रूढ इंग्लिश शब्दांमध्येच थोडीशी दुरुस्ती करून twidiot, tweetheart असे शब्द मिळाले की twittaholic, twiddict म्हणजे काय असू शकेल ते कळू शकते. अनेक शब्दांकरता एक शब्द योजणे, नव्याने तयार करून वापरणे, ते रूढ करणे ह्या क्रिया ते आत्मविश्वासपूर्वक करतात. Twooglingसारखा आडमार्गावरील एखादा शब्दप्रयोग त्रास देईल, परंतु त्याचाही धसका घेतला जात नाही. कारण तो संकरित शब्द असून त्यामध्ये गूगलिंग आणि ट्विटिंग ह्या दोन्ही क्रिया अंतर्भूत असणार हे उमजून येते. गूगल हे वास्तविक एक महाजालीय साधनाचे नाव. त्या साधनाचा उपयोग करून

आपल्याला हवी ती माहिती शोधण्यासाठी ते वापरले जाते. परंतु त्याचा वापर लोकांकडून इतक्या व्यापक स्तरावर व अग्रक्रमाने होतो की गूगल वापरून माहितीचा शोध घेण्याच्या क्रियेलाच to google, म्हणजे गूगल करणे, गूगलिंग करणे असा अर्थ प्राप्त झाला आहे. (मीदेखील आता महाजालीय व्यवहार करताना अनेक वेळा हवी असलेली माहिती गुगलूनच उपयोगात आणतो!) त्याप्रमाणे गूगलचा उपयोग करून महाजालावर विहार करीत असताना, त्याचवेळी ट्विटरवरल्या आपल्या मित्रमैत्रिणींकडून काय काय निरोप, माहिती वगैरे आलंय ते पाहात बसणं म्हणजे to twoogle (ट्वूगल), ट्वूगलिंग करणे ही संकरित क्रिया होय!

पलीकडील व्यक्तीला आमचे म्हणणे काय आहे हे कळले म्हणजे झाले. भाषेकडे संवादाचे माध्यम म्हणून पाहा, तिच्या घटकांची, व्याकरणनिष्ठ रचनेची चिकित्सा करीत बसू नका, एवढाच माफक संदेश ह्या नव्या भाषेने दिला आहे. एके काळी आपल्याला काय म्हणायचे आहे ते समोरच्या व्यक्तीला किंवा समूहाला पटवून देण्याकरता खूप वेळ आणि खूप शब्दसंपदा खर्च करून, पांडित्य पणाला लावून सांगावे लागत असे, लिहून द्यावे लागत असे. अलीकडे मात्र, लघुसंदेश (एसएमएस), तत्परसंदेश (इन्स्टंट मेसेजिंग) पाठवून निरोप देणे-घेणे, स्काइपिंग करून (म्हणजे स्काईप ह्या अनुयोजनाद्वारे परस्परसंवाद साधण्याची सोय वापरून) व्हीडियो चित्रणाद्वारे एकमेकांकडे 'याचि डोळां' पाहात पाहात, एकमेकांशी संवाद करणे, जवळीक साधणे, ट्विटरच्या साहाय्याने एकमेकांच्या संपर्कात राहणे इत्यादी गोष्टींमुळे भाषेचे स्वरूप झपाट्याने बदलत चालले आहे असे दिसून येते. मोजके शब्द, नेमका आशय आणि रोकडा व्यवहार ह्या गोष्टींवरच नवीन पिढीचा अधिक विश्वास दिसत आहे. विशेष करून तरुण पिढीला एकूणच जीवनात येणाऱ्या संधींचा लाभ उठवण्यासाठी लागणारी जागा, वेळ पुढील काळात पुरेशा प्रमाणात उपलब्ध राहणार नाही ह्याची प्रकर्षाने जाणीव झाली असावी की काय, अशी शंका येते. पटवापटवी करण्यासाठी पूर्वीइतकी शब्दसंपदा वापरावी लागत नाही आणि वेळही दवडावा लागत नाही हे तरुण पिढीने प्रचंड वेगाने चालणाऱ्या ह्या प्रभावी माध्यमाच्या वापराने सिद्ध करून दाखवले आहे.

मोबाईल फोनद्वारे वापरली जाणारी लघुसंदेश (एसएमएस) सेवा, महाजालीय अनुयोजनांद्वारे वापरली जाणारी चॅटिंग सुविधा वगैरेंसाठी आज लोक इंग्लिशबरोबर इतर भाषांमधूनही एकमेकांशी कोणत्याही अडचणींशिवाय संवाद साधू शकत आहेत. ट्विटर ह्या अलीकडे अतिशय लोकप्रिय झालेल्या माध्यमात मात्र आजच्या पिढीला इंग्लिश भाषा आणि लिपी ही सर्वात लवचीक आणि संवादासाठी लागणाऱ्या गरजा बहुतांशी भागवणारी आहे असे खात्रीने वाटते, म्हणूनच इंग्लिशमधील असंख्य शब्दांची नवीन संकरित आणि संक्षिप्त रूपे वेगाने तयार होऊन ती रूढही केली जात आहेत,

इंग्लिशव्यतिरिक्त कोणकोणत्या, विशेष करून भारतीय भाषांचा/लिप्यांचा उपयोग केला जातो ते अभ्यासून पाहिले पाहिजे. मराठीतून व देवनागरी लिपी वापरून असा संवाद साधला जाऊ शकत असेल तर त्याचे आपण स्वागत केले पाहिजे. कारण त्याद्वारे मराठीमध्ये नवीन शब्दसंपदा तयार होईल, रूढ होईल आणि मराठी भाषेचा वापर अधिक व्यापक स्तरावर होत राहील. अर्थात, ती नवीन मराठी भाषादेखील पारंपरिक मराठीच्या भाषावैज्ञानिकांचा, विचारवंतांचा, साहित्यिकांचा जीव घाबरा करील, पण त्यांनी त्या भाषेकडे परिस्थितीने उभे केलेले आव्हान म्हणून पाहून तिच्यातील सौंदर्यस्थळे शोधून काढली पाहिजेत आणि त्याही भाषेची निकोप वाढ होण्याच्या दृष्टीने मदत केली पाहिजे.

■


**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

(१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

(२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** आनन्द काटीकर, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. F - 301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सनसिटी रस्ता, आनंदनगर सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(५) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र० 5, पुणे 411 002.

मी, आनन्द काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**आनन्द काटीकर** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

# शिक्षणाचे माध्यम सेमी इंग्लिश असावे का?

व०सी० देशपांडे

**प्रस्तावना** - शिक्षणाचे माध्यम निश्चित करणे ही वरवर वाटते तेवढी सोपी प्रक्रिया नाही, हे जगभरातील अनेक देशांच्या अनुभवांवरून स्पष्ट झाले आहे. हे दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या देशांबाबत आढळून आले आहे. सोविएत युनियनच्या विघटनानंतर स्वतंत्र झालेल्या देशांसमोरील प्रश्नांवरूनही हे दिसून आले आहे. आपण तर अनेक दशके ते अनुभवतो आहोतच; पण आता त्यासंबंधी आपण अधिक गांभीर्याने विचार करण्याची वेळ आली आहे; कारण आपणांकडे घाईघाईने माध्यमासंदर्भात निर्णय घेतले जात आहेत. ज्यांच्या हितासाठी ते घेतले जात आहेत, त्यांचे या निर्णयामुळे अहितच घडणार आहे हे अनेक जणांच्या लक्षात येत नाही. माध्यमांसंबंधीचे धोरण ठरविताना त्यात राजकीय, सामाजिक आणि आर्थिक प्रक्रिया कार्यरत झालेल्या दिसतात. पण माध्यमनिश्चिती ज्या शैक्षणिक प्रक्रियेचा हा अंतर्गत भाग आहे त्या शिक्षणप्रक्रियेचा मात्र विसर पडलेला दिसतो. शिक्षणक्षेत्रात अनेक वर्षे सातत्याने काम करणारा एक कार्यकर्ता म्हणून यासंबंधी माझे विचार मला येथे मांडायचे आहेत. पण तत्पूर्वी माध्यमाच्या निर्णयावर ज्या अन्य प्रक्रिया प्रभाव टाकीत असतात, त्यांच्याकडे आपले लक्ष वेधावयाचे आहे.

**राजकीय प्रक्रियेचा प्रभाव** - इंग्लिश आक्रमकांनी एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकांपर्यंत या देशातील मोठा भूभाग आपल्या अधिपत्याखाली आणला होता. इथल्या लोकांच्या साहाय्यानेच एतद्देशीयांवर राज्य चालविणे अपरिहार्य आहे हेही त्यांनी जाणले होते. म्हणूनच त्यांना ''वंशाने भारतीय पण भाषा, विचार आणि संस्कारांनी इंग्लिश असणारे'' सेवक निर्माण करणारे शिक्षण देण्याची जबाबदारी उचलण्याचे त्यांनी ठरविले. यासाठी १८५४च्या वुडच्या खलित्यानुसार शिक्षण समाजाच्या सर्व थरांतील लोकांना खुले केले गेले. प्राथमिक आणि उच्चशिक्षणाबरोबरच माध्यमिक शिक्षणाचा शिक्षणव्यवस्थेत समावेश करण्यात आला. सरकारी शाळांबरोबरच ख्रिस्ती मिशनरी आणि स्थानिकांनी काढलेल्या चांगल्या शाळांना अनुदान देण्याची सोय करण्यात आली. विद्यार्थ्यांची मातृभाषा आणि इंग्लिश अशा दोनही माध्यमांची सोय करण्यात आली. सरकारी नोकरीसाठी इंग्लिशच्या चांगल्या ज्ञानाची अट घालण्यात आली. तसेच उच्च शिक्षणासाठी इंग्लिशची माध्यम म्हणून निवड करण्यात आली. या राजकीय निर्णयाने भारतीयांच्या

मनात इंग्लिश ही अर्थार्जनाची आणि ज्ञानार्जनाची श्रेष्ठ भाषा म्हणून जो गंड निर्माण झाला आहे तो आजच्या जागतिकीकरणाच्या जमान्यातही कायम आहे! वास्तव परिस्थिती पाहता आज इंग्लिशव्यतिरिक्त अन्य भाषांतून व्यवहार चालणाऱ्या देशांबरोबरदेखील व्यवहाराची अनेक दालने भारतीयांना खुली झाली आहेत. आपले तरुण त्या भाषा शिकले तर त्यांना अर्थार्जनाच्या अनेक संधी उपलब्ध होतील, तसेच त्या त्या भाषांतील ज्ञानही त्यांना आणि त्यांच्याद्वारे अन्य भारतीयांना उपलब्ध होईल. पण लक्षातही येत नाहीत इतक्या कमी प्रमाणात तसे प्रयत्न चालू आहेत. या उलट इंग्लिश ही शिक्षणाच्या माध्यमाची भाषा असलेल्या अमेरिकेत हे प्रयत्न विसाव्या शतकाच्या द्वितीयार्धापासून सुरू झाले होते. आपल्या तरुणांनी विविध देश, भाषा आणि संस्कृती यांचा अभ्यास करावा यासाठी त्या देशाने अनेक उपक्रम हाती घेतले. ते असे : अशा विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देणे, त्यांच्या अनुभवांवर चर्चासत्रे आयोजित करणे, संशोधन प्रकल्प सुरू करणे, एवढेच नव्हे तर असे विद्यार्थी तयार व्हावेत म्हणून अध्यापक शिक्षणाचे तत्संबंधी शिक्षणक्रम सुरू करणे इत्यादी.

आपल्याला राजकीय स्वातंत्र्य मिळून ६५ वर्षे उलटली, एकविसाव्या शतकाचे पहिले दशकही उलटले; पण एकोणिसाव्या शतकात परकीय राज्यकर्त्यांनी घेतलेले शिक्षणाच्या माध्यमासंबंधीचे निर्णय बदलण्याची राजकीय इच्छाशक्ती आपण दाखवू शकलेलो नाही ही वस्तुस्थिती आहे. मलेशियाने हे केवळ २६ वर्षांत साध्य करून दाखविले होते.

**सामाजिक-आर्थिक प्रक्रियांचा प्रभाव** - ब्रिटिशांच्या राज्यात शतकानुशतके शिक्षणापासून वंचित राहिलेल्या भारतीय समाजघटकांना पहिल्याप्रथम शिक्षणाची द्वारे खुली झाली. मानवतावादी समाजसुधारक आणि दूरदृष्टीचे शिक्षणप्रसारक यांच्या अथक प्रयत्नांचा आणि मार्गदर्शनाचा लाभ झाल्यामुळे बहुजनसमाजात आणि सर्व स्तरांतील स्त्रीवर्गात अभूतपूर्व जागृती निर्माण झाली. १९५० साली स्वतंत्र भारताची राज्यघटना अस्तित्वात आली आणि या समाजघटकांना केवळ शिक्षणाचे आणि अर्थार्जनाचे समान हक्क मिळाले असे नाही, तर आरक्षण, शिष्यवृत्त्या यांसारख्या सकारात्मक उपायांचेही साहाय्य मिळाले. त्यामुळे साहजिकच अनेकांना आपले शिक्षण पुरे करता आले. याचे महत्त्वाचे दोन परिणाम आपल्याला पाहावयाला मिळाले. एक म्हणजे अर्थार्जनाच्या अनेक संधी त्यांना उपलब्ध झाल्या आणि त्याहीपेक्षा मोठा परिणाम म्हणजे त्यांच्यात अस्मिता जागृती झाली. संधी मिळाली तर आपणही इतरांबरोबरीने काम करू शकू, आपल्या ठिकाणचे सुप्त गुण प्रकट करू शकू, असा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणी निर्माण झाला. आणि तशी उदाहरणेसुद्धा दिसू लागली. महाराष्ट्राचे उदाहरण पाहिले तर काय दिसते? संधी प्राप्त झाल्यामुळे समाजात बदल वेगाने घडू लागले, इतके वर्ष मागे राहिलेले समाजघटक पुढे येण्याचे मार्ग शोधू लागले. शिक्षणाचे अनुभवलेले सामर्थ्य आणि

लोकशाहीने संघटनाद्वारे सत्तेचा दाखविलेला मार्ग यामुळे बहुजन समाजातील आघाडीवर असलेल्या घटकांनी राज्याची सत्ता मिळविली, नवी सत्तास्थाने निर्माण केली आणि त्यांच्या घरी सुबत्ता नांदू लागली. १९७०नंतर ज्यांच्या हातून सत्ता गेली होती त्यांनी आपल्या समायोजनाचे नवे मार्ग शोधले. नव्याने स्थापन होऊ लागलेल्या कारखानदारीसाठी आवश्यक असलेल्या प्रथम व द्वितीय स्तरांसाठीचे मनुष्यबळ या समाजघटकातून मिळू लागले. त्यांनी रुळविलेल्या मार्गावरून अन्य समाजघटकांतील सुशिक्षित तरुण चालू लागले, आपल्या अंगभूत गुणांनी पुढे जाऊ लागले, केवळ देशातच नव्हे; तर परदेशांतही अशा सुशिक्षित आणि प्रशिक्षित मनुष्यबळाला संधी मिळू लागल्या. त्यातही ज्यांचे इंग्लिश माध्यमातून शिक्षण झाले आहे त्यांना अधिक संधी मिळतात अशी समजूत मूळ धरू लागली आणि मग इंग्लिश माध्यम असलेल्या शाळांची संख्या वाढू लागली. नव्वदचे दशक उजाडले आणि जागतिकीकरणाचा प्रभाव दिसू लागला. संगणक-संप्रेषण तंत्रज्ञानाने तर सर्व स्तरांवर अनेकानेक संधी उपलब्ध होऊ लागल्या आणि त्यापाठोपाठ इंग्लिश माध्यमांच्या शाळांची संख्याही वाढू लागली. हे सारे बदल पाहणाऱ्या अन्य समाज घटकांच्या पालकांमध्ये असा समज दृढ होऊ लागला की ऐहिक प्रगती करून घेण्याचा एकमेव मार्ग म्हणजे मुलांना इंग्लिश माध्यमाच्या शाळांत घालावयाचे. पण त्या शाळांमध्ये प्रवेश मिळविणे धनिकांच्या मुलांनाच शक्य होते. ज्या शाळांतील ही मुले इंग्लिश माध्यमाच्या शाळांकडे वळत होती, त्या शाळांनी गणित आणि विज्ञान इंग्लिशमध्ये शिकविण्याची सोय करून तो ओघ थोपविण्याचा प्रयत्न सुरू केला. या शाळांतीलसुद्धा शुल्क भरणे ज्या पालकांना अवघड होते अशांनी आपल्या मुलांची नावे स्थानिक स्वराज्य संस्थांनी चालविलेल्या शाळांत दाखल केली होती. मुलांचे चौथीपर्यंत शिक्षण झाल्यावर काही पालकांनी आपली मुले इंग्लिश माध्यमाच्या शाळांत दाखल करून घ्यायला सुरुवात केली होती. अशा परिस्थितीत आहे त्या विद्यार्थ्यांना टिकवून ठेवण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनीही इंग्लिश माध्यमाची आणि ते जमले नाही तर सेमी इंग्लिश माध्यमाची सोय करायला सुरुवात केली. अशाप्रकारे सामाजिक प्रक्रियांच्या प्रभावाने वाढत चाललेल्या सेमी इंग्लिश माध्यमाच्या शाळांच्या संख्येकडे पाहून काही जणांना वाटू लागले की, आपल्या राज्यात एक शांततापूर्ण क्रांती घडते आहे. क्रांती ही नेहमी अचानक घडलेली दिसते, पण प्रत्यक्षात ती काही विचारवंतांच्या प्रेरणेतून आणि कृतिवीरांच्या अथक प्रयत्नातून निर्माण होते. तसे काही इथे झालेले नाही!

**प्रभावहीन शिक्षणव्यवस्था** - स्वातंत्र्यानंतर राष्ट्रीय आणि राज्यपातळीवर शैक्षणिक पुनर्रचनेसाठी अनेक आयोग आणि समित्या नेमल्या गेल्या. १९६८ आणि १९८६ (१९९२ पुनर्रचित)ची राष्ट्रीय शैक्षणिक धोरणे प्रसिद्ध झाली, पण व्यवहारात मात्र १९व्या शतकात ब्रिटिशांनी रुजविलेली शिक्षणपद्धती आणि शिक्षणव्यवस्थाच चालू

राहिली! आजही सेवेसाठी मनुष्यबळ निर्माण करण्याचे काम या व्यवस्थेमार्फत इमानेइतबारे चालू आहे. त्यासाठी अपेक्षित वर्तन दाखविणाऱ्या परीक्षार्थींची निवड करणारी व्यवस्था आजही चालूच आहे. लक्षावधी विद्यार्थी पात्रतेची प्रमाणपत्रे घेऊन बाहेर पडत आहेत आणि लक्षावधी मस्तकांवर नापासीचा तप्त शिक्का उमटतो आहे. या परीक्षापद्धतीत बदल होण्याची नुसती चाहूल लागली तरी क्षणाचाही विलंब न लावता तज्ज्ञ आपला मौलिक निषेध व्यक्त करताहेत आणि टीआरपीची आस लागलेल्या माध्यमांनी दिलेल्या भडक मथळ्यांना घाबरून पालक आपल्या मुलांच्या भविष्यात अंधार पसरणार या भीतीने कासावीस होताहेत. याच माध्यमाद्वारे या बदलाचा अर्थ स्पष्ट करणारे माजी कुलगुरू जनार्दन वाघमारे यांच्यासारख्यांचे लेख मात्र दुर्लक्षित राहताहेत. राष्ट्रीय पातळीवर लगेच यावर पुनर्विचार करणारी शिक्षणमंत्र्यांची समिती स्थापन केली जात होत आहे. उद्या हे प्रागतिक पाऊल मागे घेतले गेले तर कुणाला आश्चर्य वाटणार नाही. कारण शिक्षणव्यवस्थेला योग्य शैक्षणिक निर्णयांबाबत आपला प्रभाव पाडता आलेला नाही. कोठारी आयोगाच्या (१९६४-६६) अहवालातील मातृभाषेतून शिक्षण, त्रिभाषासूत्री आणि परिसरातील शाळा यांसारख्या मौलिक संबोधांची अंमलबजावणी झाली असती तर आज माध्यमासंबंधात निर्माण झालेली गोंधळाची परिस्थिती पाहावयास लागली नसती आणि त्याद्वारे पुढच्या पिढ्यांचे होऊ घातलेले नुकसान टळले असते. पण कोणत्याही चांगल्या कल्पनांची आणि योजनांची अर्धवट अंमलबजावणी करण्याची या व्यवस्थेला जणू सवयच झाली आहे. १९६०च्या दशकातील मूल्यमापन संबोधापासून ते २००९च्या मुलांच्या शिक्षणाच्या हक्कासंबंधीच्या कायद्यापर्यंत अशी अनेक उदाहरणे आपल्याला पाहावयास सापडतील. याची महत्त्वाची दोन कारणे आहेत. एक म्हणजे ही शिक्षणव्यवस्था कोणतीही नवोपाययोजना पथदर्शी पद्धतीने पडताळून न पाहताच एकदम आणि एकाच वेळी सर्वदेशभर लागू करते. ना त्यासंबंधी शिक्षकांचे नीट प्रशिक्षण होत, ना अंमलबजावणीच्या वेळी योग्य पर्यवेक्षण होत, ना मार्गदर्शन मिळत. दुसरे कारण म्हणजे आपली शिक्षण व्यवस्था केंद्रानुयायी आहे. राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण संस्था राष्ट्रीय शालेय अभ्यासक्रम आराखडा तयार करते आणि राज्ये त्यात किरकोळ बदल करून अथवा जसाच्या तसा तो स्वीकारतात. राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद तीच रीत अध्यापक शिक्षणाच्या अभ्यासक्रमांबाबत अनुसरताना दिसते. देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळूनही राज्यांनादेखील वेगळा विचार करण्याची परवानगी नाही तर शैक्षणिक संस्थांना ती कुठून असणार? ज्या शिक्षणव्यवस्थेत विचार आणि आचारस्वातंत्र्याला स्थान नाही तिच्यात आपले निर्णय आपण घेण्याचे सामर्थ्य कसे निर्माण होणार आणि तिचा प्रभाव तरी कसा पडणार? परिस्थितिशरण बनून इतरांच्या निर्णयाशी जुळवून घेत टिकून राहणे एवढेच तिच्याकडून घडणार!

वरील वर्णन केलेल्या राजकीय-सामाजिक-आर्थिक प्रक्रियांचा प्रभाव आणि गतानुगतिक निष्प्रभ शिक्षणव्यवस्था यांच्यामुळे इंग्लिश आणि सेमी इंग्लिश शाळांची संख्या भरमसाठ वाढली आणि या शाळांत मुलाला-मुलीला दाखल केले की, आपण त्याच्या-तिच्या कल्याणाची तरतूद केली असा भ्रम पालकांच्या ठिकाणी निर्माण झाला. प्रत्यक्ष परिणाम मात्र विपरीत होताहेत. कसे ते आपण आता पाहूया.

**मातृभाषेतर माध्यमातून चालणारे शिक्षण** - मातृभाषेतून शिक्षण घेणारा विद्यार्थी शाळेत येण्यापूर्वी पाच वर्षे ती भाषा ऐकत आणि बोलत असतो. त्यामुळे त्या भाषेतील २०००वर भाषणशब्दसंपत्ती त्याच्याजवळ तयार असते. आणि त्या भाषेचे कार्यात्मक व्याकरण त्याने आत्मसात केले असते. या उलट मातृभाषेतर माध्यमातील शाळेत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्याकडे त्या भाषेतील जवळपास शून्य शब्दसंपत्ती असते. त्या भाषेतून ऐकणे आणि बोलणे जेथे अशक्य असते तेथे कार्यात्मक व्याकरणाच्या ज्ञानाची अपेक्षा कशी करणार? अशा विद्यार्थ्याला वर्गात आल्यावर पहिली जाणीव होते ती आपल्या अज्ञानाची, अपुरेपणाची. हा न्यूनगंड बरोबर घेऊनच त्याची शिक्षणाची वाटचाल सुरू होते. मूल शिकते असे आपण म्हणतो तेव्हा काय घडते, ते पियाजे या बालमानसशास्त्रज्ञांनी सांगितले आहे. ते म्हणतात की, सामोरे येणाऱ्या नव्या अनुभवांचा अर्थ मूल जुन्या अनुभवांच्या आधारे लावत असते आणि त्यातून त्याचे ज्ञान जन्माला येत असते. हे घडताना सवंगडी अथवा अन्य व्यक्ती तसेच मातृभाषा यांचा मुलांना खूप उपयोग होतो, असे दुसरे बालमानसशास्त्रज्ञ वायगॉटस्की म्हणतात. तिसरे मानसशास्त्रज्ञ ब्रूनर म्हणतात की, मुले इंद्रियांच्या साहाय्याने माहिती मिळवितात. अनेक उदाहरणांच्याद्वारे जे ज्ञान प्रत्यक्षात मिळवितात त्यांचे पृथक्करण झाल्यावर मुलांच्या मनात त्यांचे संबोध तयार होतात. पुढे या संबोधांच्या मदतीने ते दुसऱ्या अनुभवांचा अर्थ लावू शकतात, त्यातून आणखी संबोध तयार होतात. या संबोधांच्या आधारे मुले, व्यक्ती, प्राणी, वस्तू यांच्या अनुपस्थितीतही विचार करू शकतात, कल्पना करू शकतात, तुलना करू शकतात, निष्कर्ष काढू शकतात आणि भराभर प्रगती करतात. समस्यांनी बेजार झालेल्या आणि स्पर्धात्मक वातावरणात जगणाऱ्या एकविसाव्या शतकातील नागरिकांना आवश्यक असलेली ही बौद्धिक कौशल्ये आहेत. पण मातृभाषेतून शिक्षण न घेणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये मात्र त्याबाबत कमतरता निर्माण होणार आहे. मातृभाषेतर माध्यमाच्या शाळांतून शिकणाऱ्या मुलांच्या बाबतीत संबोधनिर्मितीची ही नैसर्गिक प्रक्रिया घडत नाही. कारण त्यांनी मोठे होताना घेतलेल्या अनुभवांना दिलेले संबोध रूप हे त्यांच्या मातृभाषेतील संज्ञांचे असते. या संज्ञांच्या आधारेच ते विविध उच्चतर मानसिक प्रक्रियांचा उपयोग करण्याची शक्यता असते. परंतु अन्य भाषेतून चालणाऱ्या शिक्षणात या संज्ञांचा क्वचितच उपयोग केला जातो. मुलांशी बोलल्या जाणाऱ्या त्या भाषेतील शब्द त्यांना

अपरिचित असतात. त्या संज्ञा ज्या संबोधांचा निर्देश करतात. ते संबोध स्वानुभवातून शिकलेले नसल्यामुळे त्यांना समजायला अवघड जातात. शिक्षक चित्र, कृती अथवा स्पष्टीकरणाच्या मदतीने ते संबोध समजावून देण्याचा प्रयत्न करतात. पण त्यासाठी उपयोगात आणलेली उदाहरणे मुलांच्या अनुभवांतील असतातच असे नाही. जेव्हा शिक्षकांना मुलांच्या अनुभवांचा आणि ते ज्या परिसरात घेतलेले असतात त्या परिसराचा परिचय असतो तेव्हाच अशी उदाहरणे ते देऊ शकतात. पुन्हा त्यासाठी एकाच परिसरातून आलेली मुले वर्गात असावी लागतात आणि शिक्षकांचे माध्यमभाषेवर पूर्ण प्रभुत्व असावे लागते. केवळ मागणी आहे म्हणून घाईघाईने काढण्यात आलेल्या शाळांत अशा शिक्षकांचा अभाव असतो ही वस्तुस्थिती आहे. या सगळ्यांचा विचार करता मुलांचे शिकणे किती अवघड होऊन बसते याची आपण कल्पना करू शकतो. त्यावर उपाय केला जातो तो पाठांतराचा. बऱ्याच वेळा हे पाठांतर अर्थहीन बनते आणि पुढील शिक्षणात अधिक अडथळे निर्माण होतात. ते अडथळे दूर करण्यासाठी पालकांना वेळ काढावा लागतो. सुशिक्षित पालकांपैकी केवळ काही जणांनाच हे जमते. उरलेल्यांपैकी काहीजण शिकवण्या वगैरे सोय करून मुलांच्या अडचणी दूर करतात. अशी मुले पुढचे शिक्षण घेऊ शकतात. अशिक्षित आणि गरीब पालकांच्या मुलांना अशी मदत मिळू शकत नाही. त्यामुळे असे विद्यार्थी मागे पडू लागतात. वाढत्या इयत्तांबरोबर त्यांच्या अडचणींचे डोंगर अधिकाधिक मोठे होतात, काही वेळा तर ते ओलांडणे अशक्य बनते. असे विद्यार्थी मग अनुत्तीर्ण होतात आणि शाळा सोडून देतात. त्यांच्या या परिस्थितिजन्य अपयशातून पुढील आयुष्यातील समायोजन कठीण होऊन बसते. हे विद्यार्थी मातृभाषेतून शिकले असते तर त्यांच्यावर ही पाळी आली नसती हे नक्की.

**सेमी इंग्लिश माध्यमातून चालणारे शिक्षण** - सेमी इंग्लिश माध्यमाची सोय दोन कारणांनी झालेली दिसते. एक म्हणजे विद्यार्थी गणित आणि विज्ञान हे विषय इंग्लिशमधून शिकले तर त्यांना पुढील अभ्यासक्रम शिकणे सोपे जाईल असे काहीजणांचे म्हणणे आहे. दुसरे म्हणजे इंग्लिश माध्यमाची शाळा काढता येत नाही तर सेमी इंग्लिश माध्यमाची सोय करू आणि शाळा सोडून जाणारा लोंढा थांबवू, असा संबंधित व्यक्तींचा विचार असतो. दुसरे कारण अशैक्षणिक आहे हे लगेचच लक्षात येते. पण पहिले कारणही शैक्षणिकदृष्ट्या सयुक्तिक नाही, मातृभाषेतर माध्यमाच्या संदर्भात दाखवून दिल्याप्रमाणे इंग्लिश माध्यमाच्या शाळांतील विद्यार्थ्यांना संबोधनिर्मितीमध्ये अडचणी येतात. त्यांच्यापेक्षाही कानावर जेवढे इंग्लिश पडते तेवढेदेखील सेमी इंग्लिश माध्यमाच्या विद्यार्थ्यांच्या वाट्याला येत नाही. त्यामुळे गणित आणि विज्ञानातले संबोध समजणे त्यांना अधिकच अवघड जाते. मग उरते ते पाठांतर! ते मात्र चोख होते आणि स्मरणावर आधारलेल्या परीक्षांत हमखास यशही मिळवून देते. पण संबोधांच्या अपुऱ्या ज्ञानामुळे





अनुक्रमणिका

पुढील अभ्यासक्रमात अडचणी येतात याकडे कुणाचे फारसे लक्ष जात नाही. आपल्या विद्यार्थ्यांना गणित आणि विज्ञानातले संबोध चांगल्याप्रकारे समजायला हवे असतील आणि त्यांचे पुढील शिक्षण अधिक चांगले व्हायला हवे असेल तर सेमी इंग्लिशमधून शिक्षण देणे थांबायलाच हवे.

**समारोप** - ब्रिटिशांनी आपल्या शिक्षणव्यवस्थेतून भारतीयांच्या मनात इंग्लिश ही अर्थ आणि ज्ञान प्राप्त करून देणारी भाषा आहे हा निर्माण केलेला ग्रह आजही आपल्या मनात कायम आहे. त्यांनी सर्वांना शिक्षण खुले करून दिले आणि स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेने शिक्षणापासून वर्षानुवर्षे वंचित राहिलेल्यांना सवलती दिल्या. त्यामुळे आपल्या समाजात अभिसरणप्रक्रिया सुरू झाली. पारंपरिक आस्थापनांबरोबरच कारखान्यातील नोकऱ्या सर्वांना खुल्या झाल्या. त्यात भर पडली ती जागतिकीकरण आणि संगणक-संप्रेषण तंत्रज्ञानक्षेत्रातील संधींची. यापैकी बहुतेक ठिकाणी इंग्लिशची असलेली आवश्यकता आणि मिळणारी ऐहिक सुखे पाहून दोहोंची सांगड लोकांच्या मनात बसली. याचा दृश्य परिणाम म्हणून इंग्लिश माध्यमाच्या शाळांची मागणी वाढली. ज्यांना इंग्लिश माध्यम असलेल्या शाळा काढणे शक्य नव्हते त्यांनी सेमी इंग्लिश माध्यमाचा पर्याय काढला. अंधानुकरणातून समाजाच्या सर्वस्तरांतील पालकांनी आपल्या मुलांना यापैकी मिळेल तेथे प्रवेश मिळविला. हे सारे घडताना मुलांच्या होणाऱ्या नुकसानाकडे कुणी लक्ष दिले नाही. शिक्षणात तपशील, संज्ञा यापेक्षा संबोधांना अधिक महत्त्व असते ते आत्मसात होताना त्या विषयाचे मूलभूत ज्ञान तर होतेच; पण उच्च बौद्धिक कौशल्येही निर्माण होतात. पण मातृभाषेतर माध्यमाच्या बहुसंख्य शाळांत हे शक्य होत नाही, तसेच किंवा त्याहीपेक्षा सेमी इंग्लिश माध्यम असणाऱ्या वर्गात कठीण जाते आणि विद्यार्थ्यांच्या पदरात अपयश पडते, त्यांचे भवितव्य अंधारी बनते म्हणून सेमी इंग्लिश माध्यमाचा भूलभुलैया ताबडतोब थांबवायला हवा. ■

[ मराठी अभ्यास परिषदेतर्फे १६ डिसेंबर २०१२ रोजी झालेल्या चर्चासत्रातील निबंध ]

## आवाहन

आपण ‘भाषा आणि जीवन’चे वाचक आहात. आपण परिषदेसाठी पुढीलप्रकारे सहकार्य करू शकता :

(१) स्वत: नियमित वार्षिक वर्गणी भरणे, वर्गणीदार मिळवून देणे.

(२) परिषदेचे आजीव सदस्यत्व स्वीकारणे.

(३) लेखनसहकार्य करणे.

(४) आपले महाविद्यालय आणि मित्रपरिवार यांना परिषदेशी जोडणे.

(५) परिषदेला देणगी देणे.

# सेमी इंग्लिश व समाजस्वास्थ्य

**सुमन करंदीकर**

सेमी-इंग्रजीचा निर्णय शाळापातळीवर का घेतला जातो, याचा विचार केला तर पुढील बाबी समोर येतात : इंग्रजीमुळे व्यक्तीला आपल्या सद्य सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीच्या पलीकडे जाण्याचा मार्ग खुला होतो, (व्हर्टिकल ॲण्ड होरिझोंटल मोबिलिटी) हा समज रूढ झाला आहे. मेकॉलेचा प्रभाव असे त्याचे वर्णन रूढ झाले आहे. त्यामुळे आपल्याला काही मिळवायचे असेल तर इंग्रजी आलेच पाहिजे ही मानसिकता रुजल्याने, इंग्रजी माध्यमाची शाळा, नाही तर निदान इंग्रजीतून विज्ञान आणि गणित हे विषय मुले शिकली तर पुढचे शिक्षण सोपे जाईल हा समज रूढ होत आहे. अशी सोय आपल्या शाळेत केली नाही तर लायक मुले इतरत्र जातील आणि शाळेचा दर्जा खाली जाईल ही मानसिकताही रुजायला लागली आहे.

सेमी-इंग्रजीची सोय केल्याने आपण काळाबरोबर आहोत, आपण नव्या गोष्टी स्वीकारतो याचा पुरावा देत आहोत; त्यामुळे पालकांना आपल्याच शाळेची निवड करायला एक दमदार मुद्दा आपण देत आहोत असा विचारही होत राहतो. इतर शाळांच्या बरोबरीने राहायला हवे ही अनिवार्यता सेमी-इंग्रजी स्वीकारताना शाळांना या निर्णयाच्या परिणामकारक कार्यवाहीसाठी शिक्षकांची, पालकांची आणि सेमी-स्वीकारणाऱ्या मुलांची आवश्यक ती तयारी केली पाहिजे हे व्यावसायिक भान ठेवण्याची काळजी घेणे हे जवळपास विस्मरणातच जात असावे असे दिसते. सेमी-इंग्रजीच्या दीर्घकालीन होणाऱ्या परिणामांचा विचार करण्याची गरज जाणवत नसावी; कारण आपल्या कृतीचे परिणाम कोणते होतात या तऱ्हेचा विचार करणारे नेतृत्व अभावानेच आढळते.

सेमी-इंग्रजीचे परिणाम कोणते होत आहेत? आणि त्यामुळे भविष्यात काय घडणार आहे?

**शिक्षक-वर्तन आणि परिणाम :**

या संदर्भात अनेक सेमी-इंग्रजी शाळात शिकवणाऱ्या गणित व शास्त्राच्या आणि इतर विषयांच्या शिक्षकांशी झालेल्या प्रसंगोपात्त चर्चेतून जी वस्तुस्थिती समोर येत आहे ती विचारात घेतली आहे.

- गणित आणि शास्त्र हे विषय इंग्रजीत शिकवणे यासाठी त्या विषयांवर प्रभुत्व हवे. ते आहे हे गृहीत धरू. कारण आवश्यक पात्रता (किमान कागदावरची) आहे म्हणूनच

हे विषय शिकविण्याची जबाबदारी सोपविली जाते, हे निरीक्षण आहे. तथापि हे विषय वर्गात स्पष्ट करण्यासाठी इंग्रजीवर पकड आहे की नाही याची खातरजमा होताना दिसत नाही.

महाविद्यालयात माध्यम इंग्रजी. त्यामुळे हे विषय इंग्रजीत स्पष्ट करण्याचे सामर्थ्य आहेच हे गृहीत धरले जाते. तथापि वास्तवात अशा तऱ्हेचे भाषिक कौशल्य आणि भाषेवर प्रभुत्व प्राप्त झालेले नसल्याने शिक्षकात आत्मविश्वास कमी असतो.

- भाषेवरील प्रभुत्वाने येणाऱ्या उत्स्फूर्ततेस शिक्षक मुकतो.
- खऱ्या अर्थाने दोन भाषांचा वापर करण्याचेही प्रशिक्षण नाही. त्यामुळे वर्गात अनेकदा धेडगुजरी संप्रेषण चालू असते. अनेकदा मराठीत सांगून मोकळे होणे आणि मराठीत सांगितले की कळलेच असेही गृहीत धरले जाते. (एकूणच मी सांगितले आणि ते मातृभाषेत असेल तर शंभर टक्के खात्री की मुलांना ते कळलेच या समजुतीचे आपण शिकार झाले आहोत हे विसरता येतच नाही.)
- या भाषिक दुर्बलतेमुळे संबोधांची, संकल्पनांची स्पष्टता करणे अवघड जाते.
- मुलांनाही भाषेची अडचण. त्यामुळे शंका विचारणे, प्रश्न विचारणे या प्रक्रिया घडतच नाहीत. (अर्थात एकूणच प्रश्न विचारण्याची संस्कृती विकसित झाली नसल्याचाही हा परिणाम असू शकतो.)
- पर्याय राहतो तो परीक्षेत यश मिळण्यासाठी काय करायचे? स्वाभाविकपणे सोपा पर्याय निवडला जातो; कारण येथे स्वत:ला फार कष्ट न घेता मुले खूष पालक खूष अशी 'विन विन सिच्युएशन' तयार झाल्याचा आभास निर्माण होतो. उत्तरे उतरवून देणे हा मार्ग स्वीकारला जातो.
- आशय इंग्रजीत व्यक्त करण्याच्या असमर्थतेमुळे शिक्षक सतत दडपणाखाली राहतो.
- त्यामुळे स्वत:ची अध्यापनाची तयारी म्हणजे प्रश्नोत्तरे या तऱ्हेनेच तयारी करायला तो प्रवृत्त होतो.
- तयार उत्तरांमुळे मुले खूष पालक खूष ! कारण मार्क मिळणे आणि मार्कांमुळे मिळणारे सारे पुढचे फायदे दिसत असतात. ही बेगडी खुषी अनर्थकारक आहे हा विचार करण्याचेच विचारसामर्थ्य गमावून बसलेले शैक्षणिक नेतृत्व हे सेमी-इंग्रजीच्या कृतीतून स्पष्टपणे समोर येते आहे. (पाठ करणे आणि उतरवणे म्हणजे समजले या चुकीच्या सार्वत्रिक समजामुळे सेमी-इंग्रजीच्या वर्गात समज विकसित होण्याची प्रक्रिया घडते अशी चुकीची समजूत तयार होते. मूले कुठार: असे काही घडते आहे याचाही बोध होत नाही.)

  परीक्षेचा निकाल उत्तम लागतो. शाळा, संस्था सारेच खूष होतात.
- शिकण्याची प्रक्रियाच कुंठित करणारी अनैसर्गिक वर्ग स्थिती असे अशैक्षणिक वास्तव





अनुक्रमणिका

वास्तव तयार होत राहते. प्रत्यक्षात मुले पुढे जावीत, त्यांना इंग्रजीत विषय आल्याने पुढचे शिक्षण सोपे होईल या खोट्या आशेपायी मुलांचे शिक्षणच घडत नाही.

**विद्यार्थी-वर्तन आणि परिणाम :**

सेमी इंग्रजीला विद्यार्थी निवडून वेगळी तुकडी करण्याने आपण कोणी विशेष अशी भावना विद्यार्थ्यांच्यात निर्माण होते असे शिक्षकांशी केलेल्या चर्चेतून समोर येते. हा भाग विद्यार्थ्यांच्या निकोप घडणीसाठी चांगला नाही. पाठांतराने मिळणाऱ्या गुणांनी तत्काल फायदा मिळतो. तथापि शिकण्याच्या मूळ बोधात्मक, भावनात्मक आणि कौशल्यात्मक प्रक्रियांवर प्रभुत्व, निदान त्यांचा परिचय होणे या गोष्टी बाजूलाच राहतात.

या साऱ्याचा परिणाम विद्यार्थ्यांच्यात आत्मविश्वास निर्माण न होण्यात होताना दिसतो. (१९६८च्या सुमारास रॉबर्ट गोदिनो यांच्या भारतीय विद्यापीठांवर लिहिलेल्या पुस्तकांतील निरीक्षणाची येथे तीव्रतेने आठवण होते. त्यांनी असे म्हटले होते की, विद्यार्थी महाविद्यालयात वावरतात; तथापि उच्च शिक्षणाच्या मूलभूत विचारप्रक्रियेपासून ते दूरच असलेले दिसतात. ती परिपक्वता वर्तनात दिसत नाही. सतत घोळक्यात दबकत दबकत वावरणारे हे विद्यार्थी आत्मविश्वासाने काही करतात असे दिसत नाही. शंका विचारायला जातानाही घोळकाच जातो.)

विषयावर प्रभुत्व मिळण्यासाठी ज्या भाषेतून तो व्यक्त करायचा ती भाषा उत्तमपणे आत्मसात असणे हे आवश्यक आहे. तथापि सेमी-इंग्रजी घेतलेल्या मुलांचे इंग्रजीवरील प्रभुत्व पाठ्यपुस्तकावरील प्रश्नांच्या पाठ करून लिहिलेल्या उत्तराएवढेच असे. त्यामुळे विषय समजून त्याचा आनंद मिळणे ही गोष्ट अनुभवताच येत नाही.

स्व-अभ्यासाची कौशल्ये विकसित न झाल्याने सतत कोणत्या ना कोणत्या तरी तयारीवर्गात अडकलेले हे विद्यार्थी ओझे बाळगत जगतात. त्या ओझ्याची जाणीवही न व्हावी इतके, विचार न करता घाण्याला जुंपलेल्या बैलासारखे जगणे या मुलांच्या वाटेला येत आहे. मार्क म्हणजे उत्तम तयारी, या चुकीच्या समजुतीत सगळेच विद्यार्थी अडकले आहेत. तथापि इंग्रजीत ते करणे याचे ओझे सेमी-इंग्रजीच्या विद्यार्थ्यांना अधिकच बाळगावे लागते.

आपल्या भाषेतून सहजी मिळणाऱ्या पोषणापासून यांना सेमी-इंग्रजीचा पर्याय वंचित करतो. सेमी-इंग्रजीवाल्यांची 'ना घरचा ना दारचा' अशी अवस्था होऊन जाते.

**सेमी-इंग्रजीचा आग्रह कशातून आला?**

स्वातंत्र्यपूर्व काळात, इंग्रजी अमलात इंग्रजी येणे, शिकणे हे पुढे जाण्याचे, प्रतिष्ठित होण्याचे हुकमी नाणे होते. स्वतंत्र झालो तरीही प्रतिष्ठा आणि आर्थिक सुबत्ता यांच्याशी इंग्रजीचे जोडले गेलेले नाते अतूट राहिले. किंबहुना अपेक्षांचा उद्रेक म्हणून ज्याचे वर्णन

होते त्या गोष्टींमुळे प्रतिष्ठा मिळवायचा मार्ग म्हणजे इंग्रजी येणे आणि त्या आधारे पुढे जाण्याचे प्रयत्न करताना तशा सोयी, संधी सर्वांना उपलब्ध कशा होतील याचा आग्रह धरणे हे स्वाभाविक बनले. त्यामुळे इंग्रजी माध्यमांच्या शाळांची वाढती मागणी आणि त्याला स्वस्त पर्याय म्हणून सेमी-इंग्रजी हा विचार बळावला. या ठिकाणी इंग्रजी माध्यमात कोण जाते आणि सेमी-इंग्रजी कोण घेते, या सामाजिक मागणीच्या पृथक्करणात काय आढळते? इंग्रजी माध्यमाच्या शाळा या संपन्न उच्च वर्ग आणि मध्यम वर्गातील मुलांसाठी आहेत. त्यांच्या घरी फार ना थोडे तरी इंग्रजी भाषेचे जाणकार अपेक्षिता येतात. हे पालक स्वत: उच्च शिक्षण घेतलेले, अभ्यासाची सवय असलेले, शिक्षणाच्या गरजांशी थोडे फार परिचित असण्याची शक्यता असते. तथापि असे वातावरण आणि आर्थिक सुबत्ता जी इंग्रजी माध्यमाच्या शिक्षणाशी संगत गृहीत आहे ती सुबत्ता नाही. परंतु अपेक्षा आहेत. आपल्या मुलांनीही डॉक्टर, वकील, इंजिनीअर, आता आयटीत काम करणारे व्हायला हवे या अपेक्षा वाढत आहेत. या व्यावसायिक आणि सामाजिक प्रतिष्ठा देणाऱ्या शिक्षणक्रमांसाठी इंग्रजी अनिवार्य आहे, तसेच शास्त्र आणि गणित हे विषय इंग्रजीतून येणे अनिवार्य आहे ही पक्की समजूत झालेली आहे. सर्वच व्यवसाय प्रतिष्ठित आहेत. सर्वांसाठी स्वाध्यायाची कौशल्ये आणि सवयी हव्यात, हा विचार एकूण समाज मनाला काय, शिकलेल्या लोकांनासुद्धा स्वीकारणे अवघड आहे. त्यामुळे कसे का होईना गणित आणि शास्त्र हे विषय इंग्रजीतून शिकण्याने विज्ञान शाखेतील उच्च शिक्षणासाठी फायदा होईल या तर्काच्या आधारे सेमी-इंग्रजीची मागणी वाढती राहिली. अनेकांनी सेमी-इंग्रजी म्हणजे संधीची समानता देण्याचा सोपा राजमार्ग असे त्याकडे पाहिले. संधीची विषमता कमी करणारे मार्ग अनेकदा त्यांच्या भविष्यातील परिणामांचा विचार न करताच स्वीकारले जातात. तसेच येथेही घडले. जागतिकीकरणाच्या रेट्यात इंग्रजी अपरिहार्य हा विचारही बळावला. इंग्रजीचे व्यापारीकरण झाले. भाषा एक माध्यम आणि भाषा एक विषय यातील फरक, त्याचे होणारे अध्ययनप्रक्रियेवरील परिणाम, त्याचे होणारे मानसिकतेवरील परिणाम अशा कोणत्याच गोष्टीवर शास्त्रशुद्ध विचार करायला समाजमानसाला वेळ नव्हता. निर्णय घेणाऱ्यांना, सल्ला देणाऱ्यांना भवितव्यात या धोरणाचे परिणाम कोणते होतील याचा विचार करून कृती करायला हवी हे समजले तरी ठामपणे म्हणणे जमले नाही, कदाचित असे म्हणणे म्हणजे वंचितांच्या विकासात अडथळा करण्याचे पाप आपण करतो आहोत ही अपराधीपणाची भावना त्रासदायक झाली असेल. कारण काहीही असो. सेमी-इंग्रजीचा निर्णय झाला. त्याचे होणारे परिणाम ध्यानात न घेता निर्णय झाला.

**परिणामांचे स्वरूप**

सेमी-इंग्रजीच्या विद्यार्थ्यांना मातृभाषेतून शिकण्यात जी सहजता असते त्याला मुकावे लागते. संकल्पना स्पष्टतेसाठी जी उदाहरणे, जी निरीक्षणे सहजासहजी संदर्भ म्हणून

देता येतात ती देण्यात शिक्षक आणि मुले असमर्थ ठरतात. कारण त्यांना तशा प्रकारची सहजता इंग्रजीत नसते. विद्यार्थ्याला इंग्रजीतील परिभाषा आत्मसात करता करताच नाकीनऊ येतात, त्याला ती परिभाषा आपली वाटत नाही; कारण ते शब्द आणि आपले अनुभव व्यक्त करणारे शब्द यांचे नातेच जुळत नाही. त्यामुळे पाठांतराचा मार्ग स्वीकारला जातो. या मुलांचे गणित आणि शास्त्र या दोन विषयांतील लेखन पाहिले तर त्यात लिखाणाच्या चुका सहजी आढळतात, कारण टिपण उतरवून देताना सांगितलेले अचूक उतरविणे त्यांना कठीण जाते. त्यांचे त्यांच्याच लिखाणाचे वाचन पाहिले तर ती अडथळ्याची शर्यतच ठरते. उतरवून घेतलेले समजलेले असत नाही. परीक्षेत शिक्षक गुणदान करताना मुलांकडून जे काही लिहिले जाते त्याचा अर्थ जाणून गुण देतात. प्रत्यक्षात ती संकल्पना समजल्याची खूणगाठ उपयोजनाच्या प्रश्नांचे साहाय्याने करता येते. तथापि आपल्या परीक्षेत हे फक्त स्मरणाचीच परीक्षा घेणारे प्रश्न विचारले जातात. त्यामुळे शास्त्र आणि गणित खरे कळले किती, हे समजणे दुरापास्तच होते. अशा परिस्थितीत वेगळा विचार करणे, वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या विकासाची काळजी घेणे, स्वत:च्या विचाराने शास्त्रीय प्रकल्प करणे अशासारख्या खऱ्या अभ्यासकाची निगराणीपूर्वक तयारी घडावी असे वातावरण निर्माण होण्यातच अडथळे येतात. कारण सारा वेळ आशय पाठांतर आणि स्मरणावर आधारलेली परीक्षा पास होणे याच्या चिंतेतच जातो. ज्या उच्च शिक्षणाला विद्यार्थी जाणार त्या ठिकाणी अभ्यासक म्हणून जी मानसिकता घेऊन त्यांनी जायला हवे त्याकडे दुर्लक्ष होते. गणित आणि शास्त्र या विषयांकडे दिला जाणारा वेळ आणि इतर विषय मराठीत वाचले म्हणजे झाले, किंवा उत्तरे पाठ केली की झाले असा शॉर्टकट शोधणे यात काहीच गैर वाटत नाही. या साऱ्या गोष्टींनी अध्ययन अध्यापन अभ्यासक या साऱ्या संज्ञांना अर्थशून्य करून टाकले आहे. विद्या प्राप्त करण्यासाठी जी बौद्धिक, भावनिक आणि कौशल्यात्मक गुंतवूणक करायची सवय लागण्याकडे लक्ष द्यायला हवे त्याबद्दल कोणीच काहीही बोलत सुद्धा नाही. या सर्व बाबींची ऐशीतैशी होण्याची गती वाढती राहण्याचे मूळ कारण मातृभाषेतून होणाऱ्या शिक्षणाने समाज विकसित होण्याची प्रक्रिया विकसित होण्यासाठी शाळेआधी आणि शाळेबरोबर घर आणि परिसराचे असलेले योगदान ध्यानात घेण्याचीच गरज वाटत नाही. या एका मूलभूत गोष्टीकडे केले जाणारे दुर्लक्ष आपल्याला फार मोठी किंमत द्यायला लावणार आहे. मातृभाषेच्या संदर्भात झालेले संशोधन, त्यासंदर्भात इतर देशांचा अनुभव या साऱ्याकडे दुर्लक्ष करण्याचा अविचार आपण केलेला आहे. मूल कितीही भाषा शिकू शकते; त्याला इंग्रजी का नाही जमणार? या विचारधारेत एक मोठा गोंधळ आहे. तो बाजूला होण्याची गरज आहे. तो म्हणजे भाषा केव्हा येते याची सत्यता न समजावून घेणे. भाषा आणि शिकण्याचे आशय समजावून घेण्याचे माध्यम कोणती भाषा केव्हा

होऊ शकते याबद्दलचा विचार स्पष्ट नसणे. मातृभाषासुद्धा न आत्मसात होता माध्यम म्हणून इंग्रजीचा वापर गणित आणि शास्त्रासाठी करणे म्हणजे या दोन विषयांतील असमज वाढती ठेवणे एवढेच अशैक्षणिक काम करणे असे नसून समाजाच्या भावी पिढीच्या बोधात्मक, भावनात्मक आणि कौशल्यात्मक विकसन प्रक्रियेशी खेळणे आहे. समाजातील फार मोठा भाग एकविसाव्या शतकात समर्थपणे जगण्यासाठी आवश्यक असलेल्या जीवनकौशल्यांची काळजी न करणारा आणि सर्जनतेची नाळ न जपणारा, वेगळा विचार आणि आचार करण्याची क्षमता कुंठित झालेला असा तयार करण्याचे काम सेमी-इंग्रजीची प्राथमिक आणि माध्यमिक शाळांत कार्यवाही केल्याने होणार आहे. याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे आत्मघातच आहे.

**समारोप :**

आत्मविश्वाससंपन्न पिढी निर्माण होण्यासाठी मातृभाषेत शिकण्याचा एकच मार्ग आहे. त्याला पर्याय नाही. माध्यम भाषा आणि भाषा यांतील फरक समजावून देणे आणि मातृभाषेतून शिकण्याने शिकणे आनंददायी आणि गतीचे होते तसेच स्मरणासोबत विचाराच्या प्रक्रियेशी ते जोडले जाते याची जनमानसाला समजूत पटेल असा शास्त्रशुद्ध प्रसार करणे, पालक-शिक्षक यांच्या प्रबोधनासाठी संवाद साधणारे म्हणून माध्यमांचे उद्बोधन करणे, संशोधनाचा आधार घेताना त्याची सर्वांगाने तपासणी करून जे सार्वत्रिक आहे, त्याचाच आधार घेतला जात आहे ना हे तपासणारे आंतरशाखीय व्यासपीठ कार्यान्वित करणे आवश्यक आहे. शॉर्टकट्नी संधीची समानता देण्यातून होणारे नुकसान टाळण्यासाठी बालशिक्षणात मातृभाषा हीच शिक्षणाची भाषा हवी, त्यातून मूल शिकण्यास समर्थ बनते, पुढे जाण्याची ताकद मिळवते यावर सर्व बाजूंनी सातत्याने चर्चा आणि कृती करण्यावर भर दिला पाहिजे. मातृभाषेतून शिकलेल्यांच्या आणि स्वत:च्या वंचिततेवर मात केलेल्यांच्या व्यक्ति-अभ्यासांवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. 'सेमी-इंग्रजीचा नाद लवकरात लवकर सोडव रे बाप्पा' अशी विनवणी सर्व स्तरावरच्या नेतृत्वाला करण्यासाठी जागरण गोंधळ जे जे काही जनप्रबोधनासाठी करायला हवे ते केले पाहिजे. कारण 'राजा रात्र वैऱ्याची आहे.' स्वत:चा संभाळ करायला आणि जगात ताठ मानेने जगायला शिकणे घडले पाहिजे आणि त्यासाठी मातृभाषेला पर्याय नाही हे उमगले पाहिजे आणि कृतीत यायला, प्रयत्नांची शिकस्त करायला प्रेरणा जागी व्हायला हवी.

[ मराठी अभ्यास परिषदेतर्फे १६ डिसेंबर २०१२ रोजी झालेल्या चर्चासत्रातील निबंध ] ■





अनुक्रमणिका

# माझा मुलगा शाळेत संस्कृत का शिकतो?

मूळ इंग्रजी लेख : **रुत्जर कोर्तेनओर्स्त**
अनुवाद : **मनोहर राईलकर**

**प्रास्ताविक :** बंधुभगिनींनो, काही दिवसांपूर्वी एक इंग्रजी लेख माझ्या दृष्टीस पडला. मला तो आवडला. म्हणून त्याचा मराठी अनुवाद करायला घेतला. कुणाही भारतीयानं भारावून जावं, असंच प्रस्तुत लिखाण होय. वाचू लागलो की, ते लक्षात येतं. मात्र, तेवढ्यानं भागणार नाही. त्यास काही दायित्वही आपणा सर्वांवर येतंच.

भारतातील शिक्षणतज्ज्ञ, भाषाशास्त्रज्ञ, राज्यकर्ते आणि राजकीय नेत्यांनी, त्यांच्या या भाषणाचा काळजीपूर्वक विचार करायला हवा.

रुत्जर कोर्तेनओर्स्त (Rutger Kortenhorst) हे आयर्लंडमधील डब्लिनच्या जॉन स्कोटस (John Scottus) शाळेत संस्कृतचे शिक्षक आहेत. संस्कृत शिकण्यामुळं मुलांना कोणते लाभ होतात, याबद्दल पालकांना ते संस्कृतविषयीच्या स्वतःच्या अनुभवातून सांगत आहेत.

( १ ) रूपांतर करताना मूळ भाषणातील (परि० १०) काही भागाला मी कात्री लावली. कारण, संस्कृतचं ते वर्णन मला अवास्तव, अतिव्याप्त वाटलं. संस्कृत भाषेच्या प्रथम दर्शनानं भारावून जाऊन संबंधित व्यक्तीनं तसं वर्णन केलं असण्याची शक्यता असेल. भारतीयांनासुद्धा संस्कृतच्या प्रथम दर्शनानं भारावल्यासारखं होतं. तिथं पाश्चात्त्यांना होणं स्वाभाविकच म्हणायला हवं. परिणामी त्यानं संस्कृतला हवे तसे गुण चिकटवले असणं असंभाव्य नाही.

( २ ) विवेकानंदांच्या पहिल्या भाषणाचा काळ (परि० १२) मुळात चुकीनं १८८० दिला आहे. तो १८८३ हवा.

( ३ ) लेखाच्या सत्यतेविषयी निःशंक असावं म्हणून प्रस्तुत लेखाचा पुन्हा शोध घेण्याचा प्रयत्न केला तेव्हा मलाही तो महाजालावर उपलब्ध झाला. तेव्हा त्याच्या सत्यतेबद्दल आता शंका नाही.

( ४ ) मुळातील स्पेलिंग John Scottus असंच आहे. त्यामुळं मी मराठीत स्कोटस असं लिहिलं आहे. ते चुकीचं असेल, तर जाणकारांनी कळवावं.

( ५ ) परिच्छेदांना अनुक्रमांक नव्हते. संदर्भाकरता आवश्यकता वाटल्यानं, साधारण विषयवारी करून मीच दिले आहेत.

१. सभ्य स्त्रीपुरुषहो, 'नमस्कार. जॉन स्कोटस शाळेतं माझे अपत्य संस्कृत का शिकतें?' यावर आता आपण तासभर चर्चा करणार आहोत. त्यानंतर 'हा विषय निवडल्यामुळं आपली मुलं खरोखर किती भाग्यवान ठरली आहेत', तुम्हीही याच निष्कर्षाली याल, हे मी आत्ताच पैजेवर सांगतो.

तुमच्या मुलानं संस्कृतचीच निवड का करावी ते प्रथम पाहू. ही भाषा शिकवणारी आख्ख्या आयर्लंडात आमची एकमेव शाळा आहे. तेव्हा, त्यामागचं कारणही स्पष्ट करायला हवं. जेएसएसप्रमाणं (जॉन स्कोटस शाळा) आपल्या अभ्यासक्रमात संस्कृत भाषेचा अंतर्भाव करणाऱ्या जगभरात आणखी ८० शाळा आहेत. (त्या सर्व तत्त्वज्ञान-पाठशालांच्या शाखा होत.)

२. दुसरी बाब. संस्कृत कसं शिकवलं जातं? शाळेतून घरी परतताना, गाडीच्या मागच्या बैठकीवर बसल्या बसल्या तुमची मुलं संस्कृत व्याकरणाचे श्लोक गंमत म्हणून गुणगुणताना तुम्ही ऐकलं असेल. म्हणून, मी भारतातून शिकून आल्यानंतर आम्ही संस्कृत शिकवण्याचा विचार कोणत्या प्रकारे केला, याविषयी आधी थोडी माहिती घेऊ.

३. **संस्कृत कशाकरता? :** या प्रश्नाच्या उत्तरासाठी आपण संस्कृतची वैशिष्ट्यं कोणती ते पाहू. तिच्यातील नाद किंवा ध्वनीचे सौंदर्य, उच्चारांतील अचूकता आणि स्पष्टपणा, तिच्या रचनेतील प्रत्येक घटकाची सखोलता व निःसंदिग्धता या सर्वांचा विचार करता, तिचं पद जगातल्या इतर सर्व भाषांत मूर्धस्थानी, सर्वांत वर राहील यात शंका नाही. इतर भाषांत वेळोवेळी मूलभूत सुधारणा कराव्या लागल्या. संस्कृतवर मात्र तसे करण्याची पाळी कधीच आली नाही. कारण मानवनिर्मित भाषांतील ती सार्वकालिक परिपूर्ण भाषा होय.

४. शेक्सपीअरच्या काळातली इंग्रजी आपल्याला किती निराळी आणि दुर्बोध वाटते? वस्तुतः ती केवळ ५०० वर्षांपूर्वीची इंग्रजी आहे. पण, शेक्सपीअरच्या इंग्रजीचा, किंवा किंग जेम्सच्या बायबलातील इंग्रजीचा अर्थ लावताना आपण किती मेटाकुटीला येतो? आता आणखी थोडेसे मागं जाऊ. चॉसरचे 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' इ०स० ७००च्या आसपास रचले गेले. त्यातील इंग्रजी तर आपल्याला काहीच कळत नाही. खरे तर आता तिला कुणी 'इंग्रजी' म्हणतसुद्धा नाहीत. 'अँग्लोसॅक्सन' म्हणतात. म्हणजे तेव्हा, इंग्रजी भाषा जन्मालासुद्धा आली नव्हती! (महाजालावर इंग्रजी भाषेच्या इतिहासाचा शोध घेतला, तेव्हा रंजक माहिती मिळाली. तिची लिपीसुद्धा वेगळी - पूर्वीच्या जर्मन भाषेसारखी गॉथिक, होती. - अनु०) सर्वच भाषा ओळखू न येण्याइतक्या बदलतात, बदलत राहतात. कारण त्या सदोष असतात. हे दोष म्हणजे खरे तर विकृतीच असतात. काही भाषा तर जन्मल्यानंतर सात-आठशे वर्षांतच मरून जातात. जेमतेम एखाद्या प्रचंड





अनुक्रमणिका

रेडवुड वृक्षाइतके आयुष्य! त्या मरतात कारण एवढ्या भ्रष्टाकारानंतर त्यांच्यात काही चेतनाच शिल्लक राहात नाही.

असे अल्पायुष्य नसलेली एक भाषा मात्र आजही आश्चर्यकारकपणे जीवित आहे. ती म्हणजे संस्कृत. ती अपवादात्मक आहे. अमर, शाश्वत व सनातन आहे. ह्याचे कारण तिच्या अंतर्गत रचनेत विचारपूर्वक पेरलेली बीजे, हेच होय. व्याकरण किंवा व्युत्पत्ती नसलेला एकही शब्द तिच्यात नाही. एकूण एका शब्दाच्या उगमाचा शोध घेता येतो. पण म्हणून तिच्यात आता नवीन शब्द घडवता यायचे नाहीत, असेही नाही. इंग्रजीत एखादा आधुनिक शब्द घडवण्याकरता लॅटीन किंवा ग्रीकमधील संकल्पनांचा उपयोग केला जातो. उदा० television हा शब्द बनविण्याकरता tele (दूर) आणि vision (दृष्टी) ह्यांचा संयोग केला जातो. किंवा computer साठी compute ह्या शब्दाला er (करणारा) हा प्रत्यय लावला जातो, त्याचप्रमाणे संस्कृतातही संयुक्त शब्द घडवण्याकरता लहान लहान घटकांचा किंवा अवयवांचा उपयोग केला जातो. संयुक्त शब्द बनविणे हे तर संस्कृतचे बलस्थान आहे. संस्कृत हाच शब्द घ्या. सम्-सम्यक् (परिपूर्ण) आणि कृत (केलेली वा असलेली) या दोहोंचा मिळून तो बनतो.

५. जन्मतःच अ-क्षर (नष्ट न होणारी) भाषा असल्यामुळं संस्कृतला कोणते लाभ झाले? उदा० कधीही न बदलणाऱ्या मित्राचे काय लाभ असतात? तो विश्वासपात्र असतो. खरे ना? तसेच, संस्कृतातील सहस्र वर्षांपूर्वीचे वाङ्मय पाहिले तर काय दिसेल?

६. संस्कृतच्या या अद्वितीय वैशिष्ट्यांचा परिचय अखिल विश्वाला अलीकडे म्हणजे काही शतकांपूर्वीच झाला. त्यामुळं कितीतरी देशांतल्या विद्यापीठांत संस्कृत-विभाग निर्माण झालेले तुम्हांला आढळतील. मग ते हवाई असो, केंब्रिज वा हार्वर्ड. डब्लिनच्या ट्रिनिटी महाविद्यालयातही संस्कृतचं अध्यासन असल्याचं तुम्हाला दिसेल. सध्या ते रिक्त आहे. पण कुणी सांगावं? उद्या तुमच्या मुलांपैकीच कुणीतरी ते भरीलही.

संस्कृत भाषा सध्या जरी भारताच्या 'स्वाधीन' असली, तरी अनेक शतकांपासून विश्वभरातील लोकांना तिने आपल्याकडे आकर्षून घेतले आहे. योग, आयुर्वेद, ध्यानधारणांचे तंत्र तसेच हिंदू, बौद्ध व इतर जीवनदर्शने यांची पाश्चात्त्य जगाला कशी भुरळ पडली आहे, यावरून हे समजून येईल. स्थानिक परंपरा, संप्रदाय यांच्याशी झटापट न करता संस्कृतने त्यांना आधार देण्याचे, त्यांचा विकास करण्याचे आणि त्यांना प्रकाशमान करण्याचेच कार्य सदैव केले आहे.

७. संस्कृतच्या निःसंदिग्धपणाची सुरुवात वर्णमालेपासूनच होते. तीमधील ध्वनींच्या काटेकोर रचनेला आणि घडणीला साऱ्या जगात तोड नाही. प्रत्येक वर्णाच्या उच्चाराकरता मुखात, कंठात आणि नाकात निश्चित स्थान. त्यात कालत्रयी बदल व्हायचा नाही.





अनुक्रमणिका

म्हणूनच संस्कृत वर्ण ही अ-क्षरे असतात. अगदी मूलतत्त्वांपासून ध्वनिनिश्चिती केलेली संस्कृत ही जगातील एकमेवाद्वितीय भाषा होय. हीतील सर्व अक्षरे मुखविवरातील पाच वेगवेगळ्या स्थानांवर जन्म घेतात. थोड्याशाच मानसिक आणि शारीरिक प्रयत्नांनी सर्व उच्चारांची अतिशय बांधेसूद आणि आखीवरेखीव व्यवस्था लावता येते. (इथं वक्त्यांनी त्या स्थानांची आकृती दाखवली. आपणा भारतीयांना ते माहीतच आहे. अनु०) आता हे पाहिल्यावर मला सांगा, की a, b, c, d, e, f, g... या आपल्या वर्णमालेत काहीतरी व्यवस्था वा सुसूत्रता आढळते का? नाही. वर्णमाला 'a' पासून सुरू होते आणि ती कशीही भरकटत जाते.

८. आणि संस्कृतच्या लिपीचा डौल काय वर्णावा? आज आपण ती शिकणारच आहोत. (वक्ते फळ्यावर लिहून दाखवतात.)

तुम्ही म्हणाल, 'तुम्ही सांगता आहात ते सारं उत्तम आहे हो; पण माझ्या अपत्यावर आधीच इतक्या विषयांचा बोजा असताना त्यांनी आणखी एक नवीन विषय कशाकरता शिकायचा? आधुनिक पाश्चात्त्य जगात संस्कृत शिकून त्यांना आणखी असा काय मोठा लाभ व्हायचा आहे?'

सांगतो.

९. संस्कृत शिकल्याने त्या भाषेची गुणवैशिष्ट्ये तुमच्या मुलांतही आपोआपच संक्रमित होतील, त्यांचे मन विशाल, हृदय सुंदर, परिपूर्ण आणि औदार्यसंपन्न होऊन जाईल. कारण संस्कृत भाषेत एक अलौकिक तर्कशुद्धता आहे. तीमुळे मनाची एकाग्रता साधून माणसाला उन्नत अवस्था व निरामय आनंद ह्यांची प्राप्ती होते, असा अनुभव आहे. नवथरांना हा अनुभव अगदी प्रथमपासूनच मिळणे अशक्य नाही. संगीतात जसे सूर जुळले की श्रोत्यांना एक उच्च प्रतीचा आनंद लाभतो, तसाच इथे मिळतो. त्यासाठी फक्त अविचल एकाग्रता साधायला हवी. ती जीवनाच्या सर्व क्षेत्रांत व कार्यांत, तसेच शाळेत व बाहेरही लाभदायक होते. संस्कृत शिकल्याने तुमच्या मुलांना सहज-स्वाभाविकपणाने, पूर्णपणे जीव ओतून काम करता येईल. दैनंदिन कामात, नातेसंबंध जोपासण्यात, क्रीडा व मनोरंजनात, खरं तर जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत ती उच्च क्षमतेची, संतुष्ट व समाधानी राहतील.

संस्कृतच्या अध्ययनामुळे इतर भाषा शिकणेही सोपे जाते. कारण, सर्व भाषांनी सदा तिच्यातूनच उचल केली आहे. आयरिश, ग्रीक, लॅटीन, इंग्रजी या भाषांवरही संस्कृत व्याकरणाचा प्रभाव आहे. संस्कृतच्या समग्र व्याकरणातील काही ना काही त्यांनी उचललं आहे. यांतील काही इतर भाषांपेक्षा अधिक विकसित असतीलही; परंतु त्यांच्यामध्येही संस्कृत व्याकरणाचा काही भागच प्रतिबिंबित झालेला दिसतो. समग्र व्याकरण नव्हे.

१०. बांधेसूद, सुघटित, चिरेबंदी अशी एकतरी भाषा असू शकते, हे संस्कृतनं आपल्या उदाहरणानं सिद्ध केले आहे. तिच्या अभ्यासामुळं तुमची मुलं समृद्ध होतील. केवळ प्रौढ वयात नव्हे, तर शिकता शिकताच. त्यांना इतर भाषांचीही स्पष्ट दृष्टी येईल. त्याही चांगल्या बोलता येतील व त्यांना अवर्णनीय आनंद लाभेल. उत्तम अभिव्यक्ती लाभलेली तुमची मुले पुढच्या पिढ्यांचं नेतृत्वही करू शकतील.

११. वेदांमधल्या आणि भगवद्गीतेतल्याप्रमाणे विशाल दृष्टीचं वाङ्मय जगात अन्यत्र कुठंही आढळत नाही. विल्यम बटलर यीट्सनं केलेल्या उपनिषदांच्या अनुवादाने जगातील लोकांना गेल्या शतकभरात जगाच्या धार्मिक भावनांचे दर्शन घडविले आहे. त्यांचा अनुवाद वाचण्यापेक्षा साध्यासुध्या शब्दांत मांडलेलं ते सर्व ज्ञान मुळातून जाणून घेणं केव्हाही हितकर होय. आजच्या जगातील विभिन्न पातळ्यांवरील अवास्तव धर्माभिमान आणि धर्माविषयीच्या भ्रामक समजुतींमधून उद्भवलेला आतंकवाद यांना तोंड देण्याकरता आपण जागतिक धर्मांचे वास्तव स्वरूप समजून घेतले पाहिजे.

१२. **संस्कृती :** विवेकानंद हे फार मोठे आध्यात्मिक आणि द्रष्टे पुरुष होते. १८८३च्या जागतिक धर्मपरिषदेमध्ये त्यांचं मोठेपण सर्वांना कळून आलं. ते म्हणाले, ‘आपण ह्या जगात ज्ञानाचे भांडार जरी ओतले, तर त्यामुळे जगाचे काही फारसे भले होईल असे नाही. ते होण्यासाठी आपल्या रक्तात मुळातच काही सद्गुण, सभ्यता असायला पाहिजेत. आधुनिक काळात कित्येक राष्ट्रांकडे प्रचंड ज्ञानभांडार आहे; पण सद्गुणांचा अभाव आहे. त्यांचे ज्ञान आणि सभ्यता वरवरच्या आहेत. जरा खरवडून पाहिले तर रानटीपणाचंच दर्शन होईल. हे धोक्याचं आहे. समाजाला त्यांच्या मातृभाषेत माहिती दिल्याने त्यांना ज्ञानप्राप्ती होईलच. पण त्याशिवाय संस्कृतीही आवश्यक आहे.

जागतिक सुसंवाद साधण्याकरता आणि साधीसुधी तथ्ये अधिक सुस्पष्टपणं मांडण्याकरता आपल्या मुलांना संस्कृतची मदत होईल. तसं झालं तरच, पालक म्हणून आपण आपल्या कर्तव्याला जागलो असं होईल. त्यातून जगाला माणुसकीच्या, सुसंवादाच्या रूपातील फळं चाखायला मिळतील. ज्ञानाच्या पायावर बांधलेली संस्कृत ही एकमेव भाषा असल्यामुळं ती स्वत:च हे कार्य पूर्ण करील. यदृच्छेवर ती काहीही सोडणार नाही.

१३. इंग्रजीत, Rough शब्द रफ असा, तर Dough शब्द डो वाचायला आपण शिकवतो. तसे का वाचायचे? Women मधल्या o चा उच्चार इ करायचा. का? Special मधल्या ci चा उच्चार, cinema मधल्या ciपेक्षा वेगळा. का? शिक्षक सांगतात, ‘अरे, तसंच म्हणायचं असतं.’ पण त्याला काहीही तर्कशुद्ध उत्तर नाही. मग हा काहीतरी

बनवाबनवीचा, लबाडीचा खेळ असावा, असे बालकांना वाटू लागते. भाषेच्या पायाभूत शिक्षणातच असलेली असली अनागोंदी बालकांना जगाचे कसे दर्शन घडवीत असेल? भाषेचे हे भोंगळ, गोंधळानं भरलेलं रूप पाहून बालकांच्या मनात आत्मविश्वास कसा उत्पन्न होईल?

१४. आता, ज्या भाषेत सर्व काही तिच्या काटेकोर नियमांनुसारच घडतं, अक्षरांच्या आरंभापासूनच जिची उभारणी तर्कशुद्ध पायावरच केली आहे, अशा संस्कृत भाषेकडे वळू. ही भाषा घेऊन बालक जगात कसा प्रवेश करील? तर पूर्ण आत्मविश्वासाने आणि निर्भयपणेच.

संस्कृतच्या संपर्कात आल्यामुळं असे गुण संक्रमित झाल्याचे मी स्वत:च्या व इतरांच्या बाबतीत अनुभवले आहे. नुकताच मी भारतात राहून आलो. एक वर्षभर तंबूत वास्तव्य केल्यासारखे वाटले असले, तरी ते सार्थकी लागले हे मात्र खरे. तत्पूर्वी अनेक वर्षे आम्ही तत्त्वज्ञान पाठशालेतील प्रौढांना व जॉन स्कोटस शाळेतील बालकांना मोठ्या उत्साहाने संस्कृत शिकवले होते. पण, त्यातून आम्ही त्यांना संस्कृताचं अध्ययन चालू ठेवण्यासाठी प्रेरणा मात्र देऊ शकलो नाही. त्यामुळं काहीजणांनी शिकणं सोडून दिलं. त्याच्या उगमापाशी जाऊन अधिक अभ्यास करायला हवा, याची मला जाणीव झाली.

सच्च्या संस्कृत शिक्षकांनी, दैनंदिन जीवनात संस्कृतातच बोलणाऱ्या लोकांबरोबर राहायला पाहिजे. खरं तर मी त्यापूर्वी तीन उन्हाळे बेंगळुरूच्या 'संस्कृत भारती'मध्ये काढले होते. परंतु त्याने फारसे काही साध्य झाले नाही. मग मी पारंपरिक गुरुकुलात जाऊनच वर्षभर अध्ययन करायचे ठरविले. असे अध्ययन म्हणजे तेथेच वसती करणे, पोटभर भात(च) खाणे आणि भारनियमन व पाण्याचे दुर्भिक्ष्य यांना तोंड देणे, थोडे कठीणच होते. तरीही डिसेंबर २००९मध्ये मी मोठ्या पाठशालेचे उपप्राचार्यपद सोडले. संस्कृतचे अध्ययन करून उरलेला अध्यापकीय काळ आयर्लंडातच, केवळ संस्कृतच्या अध्यापनाकरता वेचायचा, असा मी निश्चय केला. उपप्राचार्यपद तसं दुष्प्राप्य. पण तरीही ते सोडताना मला बढतीच मिळाल्यासारखं वाटलं, कारण आयर्लंडमध्ये संस्कृत शिकवण्याचा हा वसा दुसरा कोण शिक्षक घेणार होता? (मी परलोकी जाण्यापूर्वी ह्या परिस्थितीत बदल होईल, अशी आशा आहे.) वयाबरोबर शरीर जराजर्जर होत गेले तरी संस्कृतच्या सहवासाने माझे मन मात्र चिरतरुण होत जाईल, असे वाटते.

संस्कृत अध्ययनाचा पहिला आणि महत्त्वाचा लाभ म्हणजे माझा आत्मविश्वास वाढला. दुसरं म्हणजे आता आपण आपले शब्द तोलून मापून वापरले पाहिजेत, असे वाटू लागले. अघळपघळ न बोलता मोजकं बोलायला संस्कृतनं मला शिकवलं. माझी एकाग्रता आणि उपस्थिती (समयोचित स्मरण होणं) नि:संशय सुधारली.

१५. **अध्यापन पद्धती :** संस्कृत कसे शिकवले जाते, ते आता बघू. नवलाची बाब म्हणजे भारतातही पुष्कळ ठिकाणी ते व्यवस्थितपणे शिकवले जात नाही. ९ ते ११ वयाच्या बालकांना ते शिकवले जाते; पण इतक्या वाईट रीतीने, की बरीच मुले अर्ध्यावरच सोडून जातात. अगदी निश्चयी असतात तेवढीच टिकून राहतात. याचे एक कारण म्हणजे भारतीयांना लागलेले पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणाचे वेड आणि दुसरे म्हणजे वसाहतीकरणाने केलेले त्यांच्या परंपरांचे पद्धतशीर उच्चाटन.

पौर्वात्य विद्या आणि व्याकरण शिकवण्यासाठी गुरुकुलातील व्यवस्था ठीक असली तरी संस्कृत-संभाषणाच्या बाबतीत मात्र तिथे आधुनिक तंत्रांचा पूर्ण अभाव होता. मागाहून, पाँडेचेरी येथील श्रीअरविंदाश्रमाच्या आंतरदेशीय शाळेतील 'नरेंद्र' नावाच्या एका शिक्षकांशी माझी गाठ पडली. व्याकरण शिकवण्याकरता त्यांनी एक अभिनव पद्धत बसवली आहे. तीमध्ये आपण व्याकरण शिकत आहोत, असं विद्यार्थ्यांना वाटतच नाही. नवशिक्यांकरता ती मुद्दाम सोपीही केली जात नाही, त्यामुळं आपला पाया पक्का होतो. तेथे संस्कृत-संभाषणाच्या काही पाठांना उपस्थित राहिल्यामुळे माझा संस्कृतशी परिचय वाढला.

१६. डब्लिनला आम्ही आता जिचा अवलंब केला आहे, त्या अभिनव रीतीकरता आपण श्रीअरविंद आणि माताजींचे ऋणी आहोत, असं नरेंद्र सांगतात. माताजींनी त्यांना सांगितलं, 'अध्यापन करताना जुन्या रीतींना मुळीच चिकटून राहायचे नाही. तर्कशुद्ध पद्धतीने शिकवायचे. मात्र त्याच वेळी आपली रीत नैसर्गिक, प्रभावी, मनाला प्रेरणा देणारी आणि विद्यार्थ्याला आपल्या सोबत झपाट्याने घेऊन जाणारी असावी.'

१७. आजच्या माझ्या संस्कृत-अध्यापन पद्धतीची तत्त्वे थोडक्यात अशी आहेत :

(अ) भाषा शिकणं हा अभ्यासाचा भाग होऊ नये. प्रत्येक जण लहानपणापासून आणि लिहायवाचायच्या आधीपासून भाषा शिकतच असतो. मग संस्कृत तरी अभ्यास म्हणून का शिकवावी?

(आ) भाषेची लिपी हा काही तिच्या अध्यापनातील मूलभूत मुद्दा नव्हे. भाषा ही मुख्यत: ध्वनींची, उच्चारित शब्द व वाक्य यांची बनलेली असते. (सध्याची संस्कृतची लिपी सुंदर असली तरी ती केवळ काही शतकांपूर्वीची आहे.)

(इ) शिकवताना नेहमी ज्ञाताकडून अज्ञाताकडे, मूर्ताकडून अमूर्ताकडे जावे.

(ई) आजच्या काळात पाठांतरापेक्षा आकलनावर भर दिला जातो. त्या दृष्टीने, पाठांतराकरता आपल्या बौद्धिक शक्तीचा १०% तर आकलनासाठी ९०% भाग खर्च व्हावा.





अनुक्रमणिका

(उ) शब्द व क्रियापदे स्वतंत्रपणे न शिकवता, त्यांचा अंतर्भाव असलेल्या वाक्यांतून शिकवावीत, कारण वाक्य हे भाषेचे सर्वांत लहान असे अर्थपूर्ण एकक आहे.

(ऊ) पाठांतर अनिवार्य असेल तेथे त्यासाठी गेय पदांचा उपयोग करावा.

(ए) गाडी चालवायला शिकण्यासाठी आपल्याला कार्बुरेटर म्हणजे काय ते समजण्याची गरज नसते. तद्वतच, भाषा शिकण्याकरता व्याकरणातील संज्ञा समजण्याची मुळीच आवश्यकता नसते.

(ऐ) नरेंद्र यांच्या मते सर्वसामान्य विद्यार्थ्याला दोन वर्षांत संस्कृत यायला हरकत नाही. परंतु मला हे जरा महत्त्वाकांक्षी वाटते. ती ज्या देशाची भाषा आहे त्या भारताबाहेर आपण राहत असल्यामुळे, येथे तीन वर्षांचा अभ्यासक्रम ठीक राहील, असे वाटते.

(ओ) भाषा हसतखेळत शिकवली पाहिजे. त्याकरता गाणी, नाट्य, संगणकीय खेळ आणि अन्य युक्त्यांचा अवलंब करावा, ज्याने शिकणे मनोरंजक होईल.

आम्ही हा अभ्यासक्रम सप्टेंबरात सुरू केला. आज मुलांच्या चेहऱ्यांवर हसू खेळतं आहे. त्यावरून, आम्ही तुमच्या मुलांना परिपूर्ण, सुघटित व आनंददायी शिक्षण देत असल्याची खात्री वाटते. अभ्यासक्रमाच्या दुसऱ्या वर्षी (ही मुले १४-१५ वर्षांची झाल्यावर) केंब्रिज विद्यापीठाच्या आंतरराष्ट्रीय परीक्षेकरता त्यांची उत्कृष्ट सिद्धता झालेली आढळून येईल. विविध श्लोकांतून गुंफलेलं त्रिकालाबाधित शहाणपणही आम्ही त्यांना थोडं थोडं पाजणार आहोत. सध्या काही विचार तर आम्ही त्यांना मूळ अभ्यासक्रमातूनच शिकवतो आहोत. उदा० प्रत्येक सजीवात परमेश्वराचं अस्तित्व आहे. मजेत राहा, परंतु त्याचे धन न लुबाडता जगा. इत्यादी.

**१८. भावी योजना :** सामाजिक उत्क्रांतीचे किंवा प्रबोधनाचे चक्र सुमारे ५०० वर्षांचं मानतात. शेवटच्या युरोपीय प्रबोधनात कला, संगीत आणि विज्ञान ह्या तीन विषयांचा विकास झाला, ज्यामधून जगाला आजचं रूप प्राप्त झालं. याचा प्रारंभ फ्लॉरेन्समध्ये झाला. थोर मानवतावादी विचारवंत मर्सिलिनो फिसिनो (Marsilio Ficino) यानं प्लेटोचं ज्ञानभांडार ग्रीकमधून लॅटीनमध्ये भाषांतरित करून आपल्याकरता उपलब्ध करून दिलं. आता आपण ज्या युगात वावरतो आहोत, तो नव्या प्रबोधनाचा प्रारंभ नसेल कशावरून? कोणी म्हणतात हे नवे प्रबोधन अर्थशास्त्र, विधिशास्त्र व भाषा तीन विषयांवर आधारलेले असेल.

आज जगाच्या कोणत्याही कानाकोपऱ्यांतून काही सेकंदातच परस्परांशी संपर्क होऊ शकत असल्यामुळे भाषेला विश्वव्यापी संदर्भ प्राप्त होत आहेत. अमेरिकेच्या अवकाश

विभागात कार्यशील असलेली नासा ही संस्था माहिती-तंत्रज्ञान व कृत्रिम-बुद्धिमत्ता (संगणक-विज्ञान) यामध्ये वापर करण्यासाठी संस्कृतचा विचार करीत आहे.

१९. संस्कृतबद्दल श्री अरविंदबाबू म्हणाले होते की, 'ती भव्यदिव्य, मधुर, लवचीक, सामर्थ्यवान, बांधेसूद, जोशपूर्ण, रसरशीत आणि त्याच वेळी तरलदेखील आहे...'

२०. जॉन स्कोटसचे विद्यार्थी म्हणतात :

संस्कृतमुळे मने तीक्ष्ण, तेजस्वी, धारदार व पारदर्शक होतात.

मनाला शांती आणि समाधान मिळते.

उत्तुंगतेचा अनुभव येतो.

आपली वाणी स्वच्छ आणि अस्खलित होऊन कोणतीही भाषा सहज बोलता येते.

२१. नासाचे रिक ब्रिग्ज (Rick Briggs) म्हणतात :

मोक्षप्राप्तीच्या विशाल वाङ्मयाचं दालन खुलं होतं.

अमूर्त अशा तत्त्वज्ञानापासून आधुनिक वैज्ञानिक शोधांपर्यंतचे मानवी जीवनाची भावी दिशा व त्याचे सर्व पैलू या भाषेत व्यक्त करता येतात.

२२. तुमच्या मनात एव्हाना काही प्रश्न उद्भवले असतील. त्यांची चर्चा केल्यानंतर, श्रोत्यांमधील एका कलंदर व्यक्तिमत्त्वाचा परिचय मी आपणाला करून देणार आहे. ते एक पालकच आहेत, पण आता संस्कृत व्याकरणातील एक उमदे व्यक्तिमत्त्व असे त्यांचे वर्णन करता येईल. जॉन दोरान (John Doran). यांनी समारोप करावा असं मी सुचवतो.

२३. श्री० दोरान : नासाचे रिक ब्रिज काय म्हणतात, तेवढंच मी सांगतो.

संस्कृत रंजक व उत्कंठावर्धक पद्धतीने शिकवली तरच ती आपली विश्वभाषा होऊ शकेल, हे निश्चित आहे. शिवाय तिच्या अध्यापनातील व्यक्तिगत अडचणी स्पष्टपणे व समजूतदारपणे दूर केल्या पाहिजेत. प्रत्येकाला जोखीम घेत व चुकतमाकतही शिकण्याची, प्रगती करण्याची मुभा असेल अशा वातावरणात हे घडवले पाहिजे.

**अनुवादकाच्या टिपा :**

(अ) वाचकांना हा अनुवाद वाचत असताना मन आनंदानं भरून येत असेल. त्यांना काय वाटलं असेल, किती अभिमान वाटला असेल, त्याचा काहीसा अंदाज मला आहे. कारण माझीही तशीच स्थिती झाली. मात्र इतक्यावर आपल्याला थांबता यायचं नाही. नासाची मंडळी म्हणताहेत, 'संस्कृत जगाची भाषा होणार हे नक्की.' (परि० २३) कदाचित, त्यांचं हे स्वप्नरंजन असेल. कदाचित, ज्याच्या आधारावर ते असं म्हणत आहेत, ते, आपल्याला (भारतीयांना) माहीत नसेल. त्यांनी प्रत्यक्ष पाहिलं असेल.

इथं मला ज्ञानेश्वरीतील ओवी आठवते. ''ना तरी निदैवाचां परिवरी। लोह्या रुतल्या

आहाति सहस्रावरी। तेथ बसोनि उपवास करी। कां दरिद्री जियें।।' (निदैव=दुर्दैवी, लोह्या=मोहरा) ज्ञानेशांचा संदर्भ वेगळा आहे. पण, इथं तो चपखल लागू पडतो. इतकं मोठं भांडार आज आपल्याकडे आहे. मात्र, आपल्याला माहीतच नसल्यानं आपला देश कंगाल अवस्थेला पोचला आहे. पण, समजा भविष्यात तसंच प्रत्यक्षात येणार असेल, तर आपण कमी पडून चालणार नाही. आपल्याला नाही पण, आपल्या मुलाबाळांना, नातवंडापंतवंडांना भविष्यात एक फार मोठी संधी चालून येणं शक्य आहे. आज जशी माहिती-क्षेत्रातल्यांना आहे, तशी त्यांना साऱ्या जगभराकडून मागणी येण्याचा संभव राहील.

संस्कृतचं स्वामित्व भारताकडे आहे, असं अजून ते म्हणत आहेत (परि० ६ व १७ ऐ). याचा अर्थ ते केव्हाही पळवलं जाणं असंभाव्य नाही. हळद, कडुलिंब, आयुर्वेद यांकरता डॉ० माशेलकरांनी दिलेला लढा प्रसिद्ध आहे. पण भाषेचं स्वामित्व असं बांधून ठेवता येतं थोडंच. बोलेल त्याची भाषा, हेच सत्य. (गोपाळ कृष्ण गोखले यांच्या इंग्लंडच्या लोकसभेतील भाषणामुळं लोक थक्क झाले होते, हे सुप्रसिद्ध आहे.) म्हणून सदैव सावध राहणं आवश्यक ठरेल.

निष्कर्ष? आजच्या मंडळींनी संस्कृत केवळ शिकायला हवं इतकंच नव्हे; तर कौशल्यानं शिकवताही येईल इतकं प्रभुत्व मिळवायलाच हवंय.

खरं सांगू? आपल्याला, म्हणजे भारतीयांना संस्कृत शिकणं खूपच सोपं आहे. कारण, संस्कृतातूनच जन्मलेल्या भारतीय भाषा आपल्या मातृभाषा असल्यानं आपण नकळत कितीतरी संस्कृत शिकलोच आहोत. ती बाब वेगळीच. त्यातल्या त्यात, मराठीभाषकांना, गोव्याच्या जनतेला, हिंदीभाषकांना आणि नेपाळींना लिपीची भेट जणू उपजतच मिळाली आहे. आपल्या पूर्वजांनी इतर भारतीय लिप्यांप्रमाणं मराठीची लिपी बदलली नाही, हे त्यांचे आपल्यावर मोठे उपकार आहेत.

(आ) आता लेखातील काही विधानं मला पटली नाहीत. त्यांतील एका विधानाचा परामर्श.

परि० १७ (आ) मध्ये तो म्हणतो, संस्कृतची लिपी काही शतकांपूर्वीची आहे. काही शतकं म्हणजे १०पेक्षा तर कमीच असंच म्हणायचं असेल. पण, हे मुळीच पटण्यासारखं नाही. वेद, सुमारे ८,००० वर्षांपूर्वीचे, २०,००० श्लोकांचं रामायण, तितकंच पुराण आणि २७,६८७ श्लोकांचं योगवासिष्ठ, सुमारे ५,००० वर्षांपूर्वीचं, एक लक्ष श्लोकांचं महाभारत. दोही अनुष्टुभ् वृत्तात बद्ध. त्याशिवाय, ब्राह्मणं, उपनिषदं, नाट्यशास्त्र, संगीतशास्त्र, अर्थशास्त्र, वास्तुशास्त्र, आयुर्वेद, धातुविज्ञान, विमानविद्या, नौकानिर्मिती नौकानयन, इत्यादी शास्त्रं, चित्रकला, शिल्पकला, मूर्तिकला, इत्यादींवरील विविध प्रकारचं वाङ्मय होतंच. इतकं सारं वाङ्मय कोणत्याही लिपीविना निर्माण होणं

आणि नंतर केवळ मौखिक रीतीनं टिकून राहणं अशक्यप्राय होय. लिपीच नसती तर लेखनही अशक्य झालं असतं.

पण, नालंदा विद्यापीठ भक्तियार खिलजीनं ११९३ साली जाळलं. तेव्हा ते सहा महिने जळत होतं. काहीजण म्हणतात तीन महिने. ठीक, तीन. पण म्हणजे किती ग्रंथ असतील? समाजात लेखनकलेचा शोध लागून, ती रूढ होऊन जनतेत मान्य होण्याला किती वर्षं नव्हे, शतकं लागत असतील? नंतर इतके ग्रंथ लिहायला एकेका व्यक्तीच्या आयुष्याची किती वर्षं गेली असतील? किती श्रम वेचले असतील? इतके ग्रंथ लिहून व्हायला किती वर्षं त्यापूर्वी गेली असतील? मुद्रणकला नव्हती, हे म्हणणं पटण्यासारखं आहे. मात्र, लिपीच नव्हती हे म्हणणं धाडसाचं तर आहेच, पण, सत्यापलाप करणारंही आहे. पुन्हा संस्कृत भाषा, लिपी, शब्द त्यांच्यातील कोटेकोर नियम, ध्वनींच्या जागा, इत्यादींची इतकी व्यवस्थित बांधणी करणाऱ्या समाजाजवळ लिपीच नव्हती, या सांगण्यावर कसा विश्वास ठेवायचा? तेव्हा लेखनाकरता लागणारी लिपी निदान रामायणाइतकी जुनी असली पाहिजे. ■

### कोकणीची उसनवारी

कोंकणी ही लवचीक भाषा. आता ती पोर्तुगीजकडून अनेक शब्द उसने घेऊ लागली, त्यात स्थानिक शब्दोच्चारानुसार बदल होणे स्वाभाविक होते. त्यानुसार पोर्तुगीज 'कांतार' हे 'कातार' बनले. 'सांतो' बनला 'सात'. 'एन्त्रादा' बनला 'ऐंत्राद'... ख्रिस्ती झालेल्यांना नावेही पोर्तुगीज देण्यात आली. पण त्यांचे लोकांनी कोंकणीकरण केले. उदा० : काँसेसाव-कोयसांव, फ्रांसिस्को-फोरांसिक, जोआव-जुआंव, आंतोनियो-आंतोन, रॉड्रीगीस-रुद्रीन इत्यादी. गावे व आडनावेही बदलली : कुठ्ठाळी-कोर्तालीम, मडगाव-मारगाव, चोडण-चोराव, कामत-कामोतीम, शेणॉय-सिनाय. अनेक शब्द लोकांनी स्वीकारले. पाव, मेज, कदेल, काजू, पपई, टमाटो, बटाट, पेर या शब्दांबरोबरच, माय (आई), पाय (वडील), तीव (काका), इरमाव (भाऊ), आदोगाद (वकील), ओर्द (आदेश), रेक्रेमेंत (अर्ज), सेलाद फोल (स्टँप पेपर), दोतोर (डॉक्टर), पारेद (भिंत), गालेरी (गॅलरी), बरांद (वरांडा), कुलचाव (चादर), बुराक (भोक), साक (गोणपाट), साय (स्कर्ट) हे तर आजही दैनंदिन व्यवहारातील शब्द आहेत.

राजू नायक, लोकसत्ता, ७ ऑगस्ट २००४



अनुक्रमणिका

# चपाती व पोळी

मो०गो० धडफळे

सध्याच्या मराठी भाषेत 'पोळी' व 'चपाती' हे जवळजवळ पर्यायशब्द म्हणूनच वापरले जातात. फरकच करायचा झाला तर उच्चभ्रू समाजात 'पोळी' व तदितर समाजात 'चपाती' हा शब्द वापरला जातो.

दै०सकाळच्या १३ जून २०१२च्या अंकात (पृ० २) येथे 'चपातीलाच पोळी म्हणतात' अशा आशयाचा मजकूर आला आहे. मागणाऱ्याला दोन पोळ्या (पुरणपोळ्या) हव्या होत्या. वाढणाऱ्या बाईंनी त्याच्या ताटात दोन 'चपात्या' टाकल्या. मागणाऱ्याच्या मित्राने खुलासा केला 'येथे चपात्यांनाच पोळ्या म्हटले जाते.'

'कालवण' व 'कोरड्यास', 'पोळी' व 'चपाती' यात सामाजिक भेद तर आहेच; पण त्याचबरोबर भाषाकुळांचा भेदही आहे. 'चपाती' हा संस्कृत 'चर्पट'चा तद्भव आहे; तर 'पोळी' हा खास द्राविडकुळातील शब्द आहे.

तमीळमध्ये मराठीप्रमाणेच 'पुरणपोळीगे' असा शब्द आहे. याचा 'संमत' भाषासिद्धान्त मांडणाऱ्या मित्रवर्यांना आनंदच होईल. तमिळ व हळेगन्नडमधील (प्राचीन कन्नडमधील) प वर्णाचा 'व्हसागन्नड' (नूतन-कन्नड)मध्ये 'ह' होतो. पुरण>हुरण, पोळी-होळी, 'पू'(फूल) 'हू' इत्यादी. 'पुराणपुष्पवल्ली' म्हणजे 'हळे-हुकबळी' (जुनी हुबळी). याचमुळे मराठीत 'होळी' रे 'होळी' पुरणाची 'पोळी' असे शब्दांकन झाले आहे.

'प', 'क' व 'य' हे वर्णही एकमेकांची जागा घेतात. विशेषण भीषण:>विभीषण: बिभीषण:, कवि>कपि (विद्वत्कवय: कवय:, केवलकवयस्तु केवलं कपय: - सुभाषित), वंग>बंग, इत्यादी. इंग्रजीतही Pig > Big (पहा शेक्सपीअर 'Loves Labour Lost :' Flueller, the German says, "the pig, or the great or mighty the magnanimous are all one reckoning, save the phrase is a little variation.")

संस्कृत 'चर्पट' याचा मराठी पर्याय चप्पट - चापट - चपाती'. कणकेची लाटी पोळपाटावर (पाहा पोळी+पाट) ठेवून लाटण्याने लाटली (म्ह० चपटी केली) की 'चपाती' तयार होते. आद्य श्रीमद्शंकराचार्यांचे 'भज गोविन्दम्' हे स्तोत्र 'चर्पटपञ्जरी' (चर्पटपञ्चरी) म्हणूनही ओळखले जाते. 'चपातीची चवडी', असा त्याचा अर्थ आहे. खरे पाहता मराठीतील 'धम्मकलाडू' (धम्म - धम्मिल्ल - गोलाकार केसांचा 'अंबाडा')

सोडला तर 'चापटपोळी'ची ही कूळकथा आहे.

खरे तर आंग्लभाषेतील Lady या शब्दाची 'मूळकथा' अभ्यासली तर त्याचा अर्थ 'पोळी लाटणारी' असाच आहे. प्राचीन आंग्ल भाषेत hiaefdige असा शब्द आहे. त्याचा अर्थ, 'गृहस्वामिनी' hiaf याचा मूळ अर्थ 'loaf.' जर्मन भाषेत मूळ अर्थ knead (कणिक तिंबणे). हा शब्दही dough आणि dairy या शब्दांशी नाते सुचवतो. थोडक्यात काय तर 'रांधा, वाढा' यातून आंग्ल Ladyही सुटली नाही म्हणायची! ती 'loaf kneader' पोळीसाठी कणिक तिंबणारी, पोळ्या करणारी बाईच राहिली. प्राचीन आंग्लभाषेत Lady म्हणजे 'bread-keeper.'

■

## इंग्रजीची परीकथा

१७५५ साली सॅम्युएल जॉन्सनने 'डिक्शनरी ऑफ इंग्लिश लँग्वेज' हा सुमारे ४३ हजार शब्द असलेला कोश सात वर्षांच्या परिश्रमातून तयार केला. व्याख्यांसहित विस्तृत अवतरणं असलेला हा पहिला इंग्रजी शब्दकोश मानला जातो. आज वेबस्टरच्या बहुसमावेशक शब्दकोशात जवळपास सव्वातीन लाख शब्द आहेत. पाचव्या शतकात व तत्पूर्वी इंडोयुरोपिअन भाषेच्या एका उपशाखेची बोलीभाषा असलेल्या इंग्रजीचं १८व्या शतकापर्यंत 'किंवा जेम्स बायबल' व शेक्सपीअरच्या भाषेत रूपांतर झालं. या भाषेची शब्दसंपत्ती वाढण्याचं कारण त्यांची व्यापारी वृत्ती आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे विविध भाषांतील शब्द सामावून घेण्याचा त्यांचा मोकळेपणा. सोळाव्या शतकाच्या अखेरीस वेगवेगळ्या ५० भाषांमधील शब्द इंग्रजीत सामावून गेले. डच, स्पॅनिश, फ्रेंच, लॅटिन व ग्रीक भाषांपासून ते संस्कृत व हिंदीच नव्हे; तर चिनी व पश्चिम आफ्रिकेतील कृष्णवर्णीयांच्या अनेक बोलीभाषांतील शब्दही इंग्रजीने अगदी मूळचे तिचेच वाटावेत एवढ्या सहजपणे सामावून घेतले. आफ्रिकन बोलीभाषांतील जवळपास सहा हजार शब्द आज इंग्रजी भाषेचे म्हणून वापरले जातात. एकच उदाहरण द्यायचं तर सेनेगलमध्ये बोलल्या जाणाऱ्या 'वोलोफ' (WOLOF) या बोलीभाषेतील BANANA या शब्दाचं देता येईल.

अरुण नेरूरकर, लोकसत्ता, ७ ऑगस्ट २००४





अनुक्रमणिका

# मराठी भाषेची साक्ष

आशा मुंडले

अपरिचित स्त्री आणि पुरुष जर घराबाहेर वावरताना, ऑफिसात, प्रवासात असे कुठेही भेटले तर संभाषण सुरू करण्याचे काही सर्वमान्य संकेत अनेक भाषांमध्ये असतात. मराठीत तसे नाहीत.

अशिक्षित किंवा अल्पशिक्षित पुरुष अशा प्रसंगी, 'अहो बाई' असे संबोधन वापरतात. त्याहून जर जास्त आपुलकी दाखवायची असली तर, 'आजी, आई, काकू, मावशी, ताई', यांतला एखादा पर्याय त्या स्त्रीच्या वयानुसार निवडतात. स्त्रिया सहसा संभाषणाची सुरुवात करीत नाहीत. पण वेळ आलीच तर 'अहो दादा, भाऊ, असे संबोधन वापरतात.

शिक्षित पुरुष अनेकदा इंग्रजीचा आधार घेतात. का? कोण जाणे. पण जर अशिष्ट वर्तन करायचे असेल तर भाषेत, कृतीत एकदम फरक पडतो. शिवराळ भाषा येते. अहो जाहोऐवजी एकेरीवर येतात. स्त्रीशी न बोलता तिच्याबद्दल आपापसात मोठ्याने तिला ऐकू जाईल असे बोलतात, 'च्यायला काय माल आहे' हे एकच उदाहरण देते.

संधी मिळाली की गर्दीत किंवा एकांतात अशिष्ट कृतीही करतात. भलत्या ठिकाणी स्पर्श करतात.

प्रतिकार निषेध, तक्रार करायच्या आधीच अपमान होऊन गेलेला असतो.

स्त्रियांना अर्थातच हे अजिबात आवडत नाही. ह्याचे प्रतिबिंब आपल्या भाषेत पडलेले आहे.

हा प्रकार अजिबात नवीन नाही. आधुनिक पोषाख किंवा राहणी यामुळे हे झालेले नाही.

मूळ दोष स्त्रीकडे पुरुषांच्या पाहण्याच्या मराठी मानसिकतेत आहे.

गेल्या तीन पिढ्यांत प्रचलित असलेले काही चपखल शब्द पाहा. (ही यादी अपूर्ण आहे.)

टवाळ, टिंगलखोर, लघळ, लुब्रा, वाह्यात, चोंबडा, लुडबुडा, डावा हात नाचवणारा, अश्लील चाळे करणारा, तोंडाचे गटार झालेला, फाजील, हलकट. अलीकडे सख्याहरी रोडसाईड रोमियो हे नवे शब्द आलेले आहेत.

त्याहून कमी त्रासदायक, पण अशिष्ट वर्तनाला टारगट, चावट, चहाटळ, वात्रट

असे म्हणतात. पण नाराजीनेच.

एस्किमोंच्या भाषेत बर्फाच्या विविध छटांना विविध शब्द आहेत. कारण त्यांचा बर्फाशी घनिष्ट परिचय. तसाच प्रकार मराठी स्त्रियांच्या अनुभवाला येणाऱ्या मराठी पुरुषांचा आहे. खूपच प्रत्ययकारी शब्द आहेत.

मराठीप्रमाणेच इतर भारतीय भाषांतूनही हीच शब्दसमृद्धी (!) आढळते.

बलात्कार हे शेवटचे टोक. पण सुरुवातीच्या काही पायऱ्या जवळजवळ प्रत्येक पुरुष मनातल्या मनात किंवा जनात पण लपूनछपून चढलेला असतो.

खरा रोग इथे आहे. स्त्री आपल्या बरोबरीची, आपल्यासारखीच 'माणूस' आहे ही धारणाच नाही. सर्व कामजीवन परस्परसंमतीने हवे, त्यातून आनंद मिळावा, ही अपेक्षाच नाही.

मालकी, पायातली वहाण, बळजबरी म्हणजे मर्दुमकी अशा विकृत मूल्यांना प्रतिष्ठा आहे, हे अनेक शतकांचे दुखणे आहे. उपाय शक्य आहे, त्याबद्दल पुन्हा केव्हातरी...

वरील विवेचनाखेरीज एक महत्त्वाचा मुद्दा असा की, बलात्कार हा फक्त लैंगिक छळाचा गुन्हा नाही. बलात्कार हा स्त्रीशरीराविरुद्ध हिंसाचार, क्रौर्य आहे. त्यातली लैंगिक कृती ही अनुषंगाने होते. स्त्रीजात तुच्छ आहे, तिला अद्दल घडवावी ही त्या मागची नेणीव आहे. इतका पराकोटीचा स्त्रीद्वेष का वाटतो, याची कारणे त्या पुरुषांच्या बालपणात सापडतात, आणि त्यांच्या सामाजिकीकरणामध्ये राहिलेल्या त्रुटींमध्येही.

लैंगिक छळ शाब्दिक अथवा कृतीने करणाऱ्या पुरुषांना त्यातून चोरटा आनंद, परपीडनातून कामतृप्ती मिळते. पण बलात्कारी माणसाला त्याच्या कृत्यातून आनंद किंवा कामतृप्ती मिळत नाही. सूडाचे क्षणिक समाधान मिळते. नंतर वैफल्य येते. तोच गुन्हा पुन्हा पुन्हा करावासा वाटतो. म्हणून कायद्याने बलात्कारी आरोपीला आजन्म तुरुंगवास आणि सक्तमजुरी द्यावी. समाजशास्त्रज्ञांनी आणि मानसशास्त्रज्ञांनी त्याच्या वर्तनाची शास्त्रीय चिकित्सा करावी. मेंदूतील हार्मोन्सचे असंतुलन सांस्कृतिक घडणीतून तीव्र, उत्तेजित होते. ते कारण समर्थन म्हणून वापरता येणार नाही. कारण मानवाला मनावर विवेकाने नियंत्रण मिळवणे शक्य आहे. बलात्कार ही सहजप्रवृत्ती नाही. बलात्कार नसणारे समाज अस्तित्वात आहेत. उदाहरणार्थ, काही आदिवासी समाज. अशा एका समाजात स्वतः एकटी राहण्याचा अनुभव मी घेतला आहे. पण सध्याची ग्रामीण आणि शहरी नागरी संस्कृती याबाबत अत्यंत मागासलेली आहे. असुरक्षित आहे.

स्त्रिया आणि पुरुष दोघांनाही एकमेकांबद्दलचा आकस, पूर्वग्रह सोडून नवी मैत्रीपूर्ण, मनमोकळी मानसिकता घडवावी लागेल. मूलगामी बदल यातूनच होतील.

बलात्कार हा एक स्वतंत्र गुन्हा आहे. तो हिंसाचार, क्रौर्य आणि लैंगिक विकृती यांचा संगम आहे. पण छेडछाड, फसवणूक, वश करण्यासाठी फूस लावणे, वेश्येकडे पैसे

देऊन जाणे हे सर्व गुन्हे असले तरी त्यामागची प्रेरणा वेगळी आहे. ह्या सर्व गोष्टी कामतृप्तीसाठी केल्या जातात. म्हणून असे सर्व गुन्हे आणि बलात्कार यांचे कायद्याने वेगळे वर्गीकरण हवे. शिक्षाही वेगवेगळ्या हव्यात.

मराठी भाषेची साक्ष मराठी पुरुषांविरुद्ध गेलेली आहे. इतर भारतीय भाषांतही असा शोध घेऊन पाहावा.

वागणुकीचे प्रतिबिंब भाषेत पडते. अशा शब्दांची गरज न पडता नव्या, निरोगी, सकस, अर्थपूर्ण शब्दांची निर्मिती भविष्यात होईल का?

■

**मानसिकता महत्त्वाची**

तुम्ही 'गुगल ॲडव्हान्स सर्च'मध्ये गेलात आणि 'भाषा मराठी'वर क्लिक केलं की, मराठीतले सगळे 'सर्च रिझल्ट्स्' तुमच्यापुढे हात जोडून उभे राहतात. ज्या वेळेला हजारो मराठी लोकांनी मराठीमधून 'ब्लॉग्ज' वापरायला मोठ्या प्रमाणात सुरुवात केली, आपली वेबसाईट्स मराठीतून तयार करायला सुरुवात केली त्या वेळेला हे परिवर्तन घडलं. कारण आमचं पोर्टल मराठीत आहे आणि जर गुगलमधून ते सर्च होत नसेल तर तो गुगलला कमीपणा आहे; आमच्या पोर्टलला नाही. त्याच्यामुळे गुगलसारखी महाकाय कंपनीही तत्काळ मराठीच्या सेवेला उपस्थित झाली. आज ज्या प्रमाणात आपण हे करायला पाहिजे, त्या प्रमाणात मात्र आपण ते करत नाहीये, ही गोष्ट जरी खरी असली तरीसुद्धा आज निरनिराळ्या ब्लॉग्जच्या माध्यमातून विविध देशांतली हजारो मराठी माणसं एकमेकांना भेटत आहेत. म्हणजे मराठीच्या अस्तित्वाचा प्रश्न तंत्रज्ञानाच्या उपलब्धतेपेक्षा जास्त आपल्या मानसिकतेचा आहे.

विवेक सावंत, महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, जानेवारी-मार्च २०१३





अनुक्रमणिका

# लोकगीतांतून प्रकटलेली सीता

**कोकिळा हणमंत चांगण**

भारताच्या संस्कृतीचे दर्शन आपणाला 'रामायण', 'महाभारत' या ग्रंथांतून घडते. रामायण, महाभारतातील कथा लोकांना जीवन जगण्यासाठी मार्गदर्शकही ठरतात. या ग्रंथांनी जशी संस्कृती जपली आहे. तसेच मौखिक परंपरेने - लोकसाहित्यानेही - विविध प्रकारे हे धन जतन केले आहे. लोकगीते, लोककथा, लोकरूढी, परंपरा, उखाणे, म्हणी, आहणे या शब्दसाहित्यातून आपणांला या संस्कृतीचा मागोवा घेता येतो. लोककथांतून आणि गीतांतूनही प्राचीन व्यक्तिचित्रे आपणांपुढे प्रकट होतात. आजी-आजोबा कथांतून आपणापुढे भीम, अर्जुन, राम, कृष्ण, सीता, द्रौपदी, सत्यवान, सावित्री यांची ओळख करून देतात. ही व्यक्तिचित्रे त्यांच्या सत्कृत्यांमुळे आदर्श मानली जातात.

लोकगीतांमध्येही रामायण महाभारतातील व्यक्तींचा उल्लेख आहे. लोकगीतांमधील स्त्रीगीतांची मुख्य नायिका सीता आहे. सीतेवर खूप गीते आहेत. तिच्या जन्मापासून ती धरणीमातेत विलीन होईपर्यंत सीता हा स्त्रीगीतांचा जिव्हाळ्याचा विषय आहे, तो तिने सोसलेल्या दुहेरी वनवासामुळे - एक शारीरिक अन दुसरा मानसिक.

सीतेच्या जीवनाची सुरुवात तिच्या पेटीतील जन्मापासून होते.

> 'सीतानाबाई बोऽऽलं आम्हां कुटला माता पिता ।
> जनक राजाच्या घरी जन्म पेटीनामधी होता ।' (१)

आपल्याला आईवडील नाहीत, ही खंत सीतामाईला आहे. जनक राजा हा आपल्याला सांभाळणारे मालक आहेत. म्हणजे लहानपणापासूनच सीता उपकाराच्या ओझ्याखाली दबली गेली आहे. तिच्या मनात खोलवर पोरकेपणाची भावना आहे. त्यामुळेच लहानपणापासून तिचे मन सोशिक झाले आहे.

सीता ही जनक राजाच्या वाड्यात लहानाची मोठी होते. तिला वेगवेगळ्या राजांची लग्नासाठी मागणी येते.

> 'सीतेला मागयिनं सभा बसली दुहियीरी ।
> लंकेचा रावयिनं मधी रामाचा वयियिरी ।
> सीतेला मागयिन जनक वाड्याला पडला वेढा ।
> राम भरतारा वाचुयिन सीता भरिबीयिना चुडा ।' (२)





अनुक्रमणिका

सीतेला खूप राजांची मागणी आली आहे. सभेच्या दोन्ही बाजू या राजांनी भरलेल्या आहेत. आणि त्यामध्ये सीतेला मागणी घालणारा रावणही आहे. सीतेला मागणी एवढ्या जणांची आली आहे की जनक राजाच्या वाड्याला पूर्ण वेढा पडला आहे. पण सीतेच्या मनात राम आहे. तिला रामाच्या नावाचा चुडा भरायचा आहे. या सर्व वरांमध्ये सीतेला रामच पती म्हणून आवडला; कारण तो खूप गुणी आहे. अशा या रामाचे वर्णन या गीतातून येते :

'असा रामया म्हणून राम । राम साखबिरचा खडा न
आसं रामाच नाव बि घेता । माझ्या रंगल्या दात दाढा ।
आसं रामया म्हणू ग राम । न राम अमृताचा पेला ।
आसं रामाच नाव बि घेता । शिण सखा माझा गेला ।' (३)

अशा रामाबरोबर सीतेचे लग्न होते. पण तिच्या नशिबात वनवास होता. रामाबरोबर जेव्हा ती वनवासात असते तेव्हा तिचा वनवास फक्त शारीरिक असतो. तिचा प्रिय पती बरोबर असल्याने ती मनातून सुखी असते. ती आपल्या पतीकडे कांचनमृगासाठी हट्ट करते :'एक हट्ट पुरवा प्रभू जनक कन्येचा ।
आणुनी द्या हो हरीण तुम्ही सोन्याचा ।' (४)

हा पत्नीहट्ट पुरवण्यासाठी राम हरिणाच्या मागे लागतात. लक्ष्मणही रामाचा धावा ऐकून रामाच्या मदतीला जातो. त्या अगोदर सीतेच्या रक्षणासाठी झोपडीभोवती लक्ष्मणरेषा ओढतो आणि सीतेला ती न ओलांडण्याची विनंती करतो. सीता ही लक्ष्मणाची विनंती दुर्लक्षित का करते हा एक मूलभूत प्रश्न आहे. तिच्या अनवधानाने रेषा ओलांडली जाते? ती जाणीवपूर्वक ओलांडते? की गोसाव्याच्या रूपातील रावण तिला रेषा ओलांडण्यास सांगतो? या प्रश्नाचे उत्तर लोकगीतांमध्ये मिळते.

'असा गोसावी बुवा ग बोऽऽल
झोळी कापड फाडगायिन । दारी पतार फोडगयिन ।
सिता सत्वाबियाला भेली न । भिक्षा रावनबिनालाऽऽ व दिली । (५)

भारतीय संस्कृतीत 'अतिथी देवो भव' समजले जाते. दारी भिक्षेसाठी आलेला कोणीही अतिथी नाराज होऊन जाऊ नये, अशी ही संस्कृती सांगते. त्यातून ऋषी, मुनी, संत, गोसावी यांचे स्थान मोठे. ते जे मागतील ते द्यावे लागे. नाहीतर दात्याचे सत्त्व जाते. याच गोष्टीचा फायदा रावणाने घेतला. गोसाव्याच्या रूपाने त्याने सीतेला रामाचे सत्त्व नेण्याची धमकी दिली. सीतेला राम हा प्रिय असल्याने आपल्या पतीचे सत्त्व तिला जाऊ द्यायचे नव्हते. म्हणून तिने लक्ष्मणरेषा ओलांडून भिक्षा दिली असावी आणि रावणाने आपला हेतू साध्य केला.

रावणाने सीतेला लंकेला नेले. राम-लक्ष्मण यांनी सीता झोपडीत नाही हे बघून

तिचा शोध घेण्यास सुरुवात केली.

'रामया लक्ष्मण हिंडती लवणानी
सीता नेलिया रावणानी ।' (६)

लवण म्हणजे जमिनीचा खोलगट भाग. या भागात राम-लक्ष्मण सीतेला शोधतात. पण त्यांना ती सापडत नाही. राम-लक्ष्मण मारुतीच्या मदतीने सीतेचा शोध लावतात.

'आडलंका सोडूनी पडलंकेला कसा गेला ।
देवा माझ्या त्या मारूतीन् सीतामाईचा शोध केला ।
आडलंका सोडूनिया पडलंका येडयिली ।
देवा माझ्या त्या मारूतीनं सीता शोधून काढयिली ।' (७)

सीतेचा शोध लागल्यानंतर रावणाला मारून राम सीतेला घेऊन अयोध्येला येतो. परटाच्या निंदेवरून राम सीतेचा त्याग करतो, असे पुराणकथा सांगतात.

'सजविला रथ रथा जुपली वासरं
वन सीतेच सासरं
सजविला रथ रथा लाविली फडकी
सीता रामाची लाडकी ।
सजविला रथ रथा जुंपल्यात हत्ती ।
सीता वधाया नेली राती ।
सजविला रथ रथा जुंपल्यात उंट ।
सीता वधाया नेली कुठं ।' (८)

रामचरित्रपर जे ग्रंथ लिहिले आहेत त्यामध्ये सीतेचा त्याग केला असा उल्लेख आहे; परंतु तिच्या वधाचा उल्लेख नाही. वरील ओव्यावरून लक्षात येते की, सीतेला जंगलात वधण्यास नेले असावे. या गोष्टीवर पुढील ओव्यांमुळे प्रकाश पडतो.

'वधिली सीतामाई, साक्ष आणिलं तिनं हात ।
कैकयी तिजी सासू, सासू जेवती दूधभात ।
वधिली सीतामाई साक्ष आणिलबी तिजं डोळं ।
राम का बी भरतार । भरतार धरणीवर लोळं ।' (९)

पूर्वी राज्यात एखाद्याकडून चूक झाल्यास राजा आपल्या सेवकांना त्या अपराध्यास जंगलात नेऊन मारण्याची आज्ञा देई. तशी लक्ष्मणाला आज्ञा दिली असावी; परंतु लक्ष्मणाने सीतेचा वध केला नसावा; कारण लोकसाहित्यात सीता वनवासात कशी जीवन जगली, लवअंकुशाचा (गीतांत लव्ह अंकुश असे उल्लेख आहेत.) जन्म, अश्वमेध यज्ञातून निघालेला अश्व लवअंकुशाने पकडणे, रामाबरोबर या मुलांनी युद्ध करणे हा उल्लेख आहे. कदाचित दुसऱ्या एखाद्या सीतेसारख्या दिसणाऱ्या स्त्रीचा वध करून तिचे हात व डोळे

सीतेच्या वधाचा पुरावा म्हणून आणले असावेत. तसेच सीतेची सख्खी सासू कौसल्या; परंतु वरील ओव्यांत कैकेयीचा उल्लेख आहे. तसेच कैकेयीचा उल्लेख काही ओव्यांत पुढीलप्रमाणे येतो :

'आसा सीतेला सासरवास सासू कैकयीनं केला ।
रामासारखा भरतार नाही वो तिनं भोगू दिला ।
असा सीतेला सासरवास । घ्या गं बायानो वाटुयानी ।
असा लंकच्या रावणानी । बट्टा लावला दाटुयांनी ।'' (१०)

डॉ० तारा भवाळकर यांनी 'लोकसाहित्यातील स्त्री प्रतिमा' या पुस्तकातील लोकगीतातील 'सीतायन'मध्ये म्हटले आहे की दुसऱ्यांदा सीतेला झालेला वनवास हा परिटामुळे नव्हे तर कैकेयीमुळे झाला. तिने सीतेला रावणाचे चित्र काढायला लावले. सीतेने फक्त अंगठा काढला. कैकेयीने चित्र पूर्ण करून रामाला दाखवले. सीता अजून रावणाचेच चिंतन करते, असे रामाला सांगितले. त्यावरून रामाने सीतेचा त्याग केला.''

'वनवासी सीतामाई । झाडासंग सांगी गोष्टी
लव्हअंकुशावेळी । पाचव्या महिन्याचा गर्भ पोटी ।' (११)
'अश्या भुईन वनामधी । कोण रडगईत ऐका ।'
सीताला समजावया । बोरी बाभळी बाइका ।' (१२)

सीता ही जंगलात एकटीच असते. ती झाडाबरोबर बोलते. तिच्या पोटात पाचव्या महिन्याचा गर्भ आहे या दिवसात तिची काळजी घेणारे कोणीतरी हवे; परंतु तिच्याजवळ कोणीच नाही. अशा वनात ती रडत असते. तेव्हा जणू काही बोरी बाभळीची झाडेच स्त्रीरूप घेऊन तिला समजावतात. तिला लवअंकुश ही बाळे होतात.

'सीताई सांगी कथा । त्यापल्या जन्माची परवड ।
लव्हअंकुश बाळा येळं । नव्हता न्हाणीला तरवड ।' (१३)
'महिन वनामधी । दिवा कुणाचा जळयितो ।
सीतेच्या मांडीवरी । पुत्र रामाचा खेळयितो ।' (१४)

अशी ही लवअंकुश बाळे मोठी होतात. रामाच्या अश्वमेध यज्ञाचा श्यामकर्ण घोडा ही दोन्ही बाळे धरून ठेवतात.

'बाणामागं बाण हाय बाणाची चळकं
लव्ह अंकुश बाळाला नव्हती रामाची वळख ।
बाणामागं बाण । बाण येत्यात छणोछणा ।
बाळ खेतरी कुणाचं । खरं सांगा लक्ष्मणा ।
श्यामकर्ण वारू। वारू बांधिला कर्दळीला ।
बापासंग पोर येतं वर्दळीला ।' (१५)

श्यामकर्ण घोड्याच्या मागे रामलक्ष्मण येतात. लवअंकुशाला रामाची ओळख नसते. ते दोघेही वडिलांप्रमाणेच शूरवीर असतात. त्यांचा पराक्रम बघून राम लक्ष्मणाला विचारतो, या क्षेत्रात ही बाळं कोणाची आहेत? लवअंकुश या घोड्याला कर्दळीला बांधून रामाबरोबर वर्दळीला येतात. म्हणजे भांडण करायला तयार होतात, म्हणजेच युद्धाला सुरुवात करतात. लोकगीतांमध्ये सीतेच्या जीवनाची कहाणी अशी आली आहे. नंतर ती लवअंकुशाला रामाकडे सोपवून जमिनीत जाते हा उल्लेख लोकगीतात मिळाला नाही; परंतु ही जनककन्या लोकगीतातून अशी प्रकटली आहे.

संदर्भ


( १ ) सौ० सुमल बिटे, मु० पिसेवाडी, पो० आवळाई, ता० आटपाडी, जि० सांगली.

( २ ) सौ० अनुसया कचेकर, मु०पो० विदाल, ता० माण, जि० सातारा.

( ३ ) सौ० सुमल बिटे, तत्रैव.

( ४ ) कल्पना चांगण, मु०पो० महिमानगड, ता० माण, जि० सातारा.

( ५ ) सौ० सुमल बिटे, तत्रैव.

( ६ ) सौ० अनुसया कुचेकर, तत्रैव.

( ७ ) सौ० शालन दिगंबर पिसे, मु०पो० बिदाल, ता० माण, जि० सातारा.

( ८ ) सौ० पद्मिनी रामचंद्र भोजणे, पिसेवाडी, पो० आवळाई, ता० आटपाडी.

( ९ ) सौ० अनुसया कुचेकर, तत्रैव.

(१०) सौ० सुमल बिटे, तत्रैव.

(११) सौ० शालन पिसे, तत्रैव.

(१२) सौ० सुमन बिटे, तत्रैव,

(१३) श्रीमती कल्पना चांगण, तत्रैव

(१४) श्रीमती कल्पना चांगण, तत्रैव

(१५) सौ० गोदाबाई अहिरेकर, मलठण, ता० फलटण.


■

# वऱ्हाडी आणि नागपुरी : स्वनप्रक्रिया

रावसाहेब मुरलीधर काळे

विदर्भात नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, वर्धा, यवतमाळ, अमरावती, वाशीम, अकोला आणि बुलढाणा ह्या जिल्ह्यांचा अंतर्भाव होतो.
या संपूर्ण विदर्भात बोलीचे एकविध स्वरूप आढळून येत नाही. बुलढाण्याकडील ती घाटावरची, अकोल्याकडील घाटाखालची, नागपूरकडील ती नागपुरी. तर, झाडी पट्टीतील ती झाडी बोली. एक ना दोन अनेक भेद एकाच प्रदेशातील बोलीभाषेत आढळतात. त्यातील वऱ्हाडी व नागपुरी ह्या बोलींची येथे तुलना करायची आहे. या संदर्भात सुरेश डोळके म्हणतात, ''नागपुरी ही वऱ्हाडीच्या सर्वांत जास्त जवळची; पण वऱ्हाडीतून अनेक बाबतीत भिन्न असलेली व मराठीच्या मूल प्रकृतीचे दिग्दर्शन करणारी मराठीची एक प्रमुख उपभाषा आहे.''(प्रा० सुरेश डोळके, 'वैदर्भी शब्दकोश', प्रस्तावनेतून). वऱ्हाडी बोलीचे भाषिक क्षेत्र म्हणून यवतमाळ, अमरावती, अकोला, वाशीम आणि बुलढाणा ह्या जिल्ह्यांची नोंद करता येते.

नागपुरी बोली ही मध्य व पश्चिम नागपूर जिल्हा, मध्य व पूर्व वर्धा जिल्हा व छिंदवाडा जिल्ह्याची सौंसद तहसील अशा क्षेत्रांत बोलली जाते. (महाराष्ट्रातील समग्र बोलींचे लोकशास्त्रीय अध्ययन', प्रा० डॉ० बाबुराव देसाई, लेख : 'नागपुरी बोली' पृ० ३१२). ह्या बोलीवर डॉ० वसंत वऱ्हाडपांडे ह्यांनी भाषाशास्त्रीय अभ्यास केला आहे. आणि तो प्रबंध पुस्तक रूपाने प्रकाशित केला. येथे नागपुरी बोलीकरिता ह्या पुस्तकाचा आधार घेतला आहे, तर वऱ्हाडी बोलीकरिता प्रस्तुत संशोधकाच्या 'आयडियॉलॉजी'चा उपयोग केला आहे.

**उच्चारविषयक साम्यभेद :**

वऱ्हाडी आणि नागपुरीत उच्चारभेद फारसे आढळत नाहीत. प्रमाण मराठीतील शब्दांचा उच्चार वऱ्हाडी व नागपुरी बोलीत होताना जवळपास सारखीच स्वनप्रक्रिया घडून होते. पुढे वऱ्हाडी व नागपुरी बोलीत आढळणाऱ्या साम्यभेदाचा विचार प्रमाण मराठीच्या आधारे केला आहे.

**स्वरप्रक्रिया :**

( १ ) प्रमाण मराठीत शब्दारंभी येणाऱ्या 'अ'चा दोन्ही बोलीत 'आ', 'इ', 'ए', 'ओ' होतो; तर मध्यस्थानी येणाऱ्या 'अ'चा 'ऊ होतो. मात्र, ही प्रक्रिया

नागपुरीप्रमाणे वऱ्हाडी प्रत्येक शब्दाला अनुसरत नाही.

उदा० (प्रमाण मराठी > वऱ्हाडी > नागपुरी)

आद्य :

अ>आ = तहान>तान्>ताहान्,
दहा>दा>दाहा, पहाटे>पायटी>पाह्यट.

अ>इ = खपली>खिपूली>खिपूली.

अ>ए = भय>भेव्>भेव्, यशोदा>(यसोदा)>येसोदा.

अ>ओ = नको>(नाई)>नोको.

मध्य :

अ>उ = आपण>आपून्>आफून्, साबण>साबून्>साबून्

(२) शब्दारंभीच्या 'आं'चा नागपुरीत 'ए' होतो.

आं>ए = गांडूळ>(गांडूळ)>गेढूर.

(३) शब्दारंभी 'इ'चा दोन्ही बोलीत 'ए', 'ओ' होतो. मध्यस्थानी आल्यास नागपुरीत 'अ' होतो. तसेच, शब्दांती आल्यास लोप होतो.

इ>ए = दिले>देलं>देलं, दीर>देर>देर, पी>पे>पे.

इ>ओ = भिवई>भावी>(भेवई)/भोवी,

इ>अ = चिलीम>(चिलीम्)>चिलम्.

इ>लोप = रीती>रीत्>रीत्.

(४) शब्दांतर्गत येणाऱ्या 'उ' स्वराचा 'अ', 'ओ' व 'व' दोन्ही बोलीत होतो.

उ>अ = मुरूम>(मुरूम्)>मुरम्, राखुंडी>(राखुंडी)>लाखड्,
लसूण>लसन्>लसन्.

उ>ओ = सुकणे>सोक्नं>सोक्नं

उ>व् = भाऊराव>भाव्राव्>भाव्राव्, नऊदा>नवुदा>नव्डाव्.

(५) शब्दांतर्गत येणाऱ्या 'ए'चा दोन्ही बोलीत 'ई', 'ये' होतो. तसेच, प्रमाण मराठीतील एकारान्त नपुंसकलिंगी एकवचनी नामे दोन्ही बोलीत 'अ'कारान्त होतात.

ए>ई = कुठे>कुठी>कुठी.

ए>ये = एक>येक्>येक्, एकनाथ>येक्नाथ>येक्नाथ.

ए>अ = कुत्रे>कुत्रं>कुत्रं, त्याचे>त्याचं>त्याचंऽ,
मोगे>मांग>मांगऽ.

( ६ ) प्रमाण मराठीतील संयुक्त स्वराचे पृथक उच्चार दोन्ही बोलींत होतात.

ऐ>अइ = चैन>चईन्>चईन्.

ऐ>अय् = हैवान>हय्वान्>हय्वान्.

ऐ>इ = नैवद्य>निवद्>निवद्.

औ>अव् = औषध>अव्शद्>अव्सीद्, कौतुक>कव्तिक्>कव्तिक,
दौरा>दव्रा>दव्रा, सौदा>सव्दा>सव्दा.

वै>उ = वैल>उल्हा>उल्हा.

( ७ ) शब्दारंभी येणाऱ्या 'ओ'चा उच्चार दोन्ही बोलीत 'उ', 'व' होतो. मध्यस्थानी येणाऱ्या 'ओ'चा कधी लोप होतो तर कधी तो उच्चारला जातो.

ओ>उ = ओंबी>उंबी>उंबई, बोल्ट>बुलुट्>बुलट्.
गोदाम>(गोदाम्)>गुदाम्.

ओ>व = ओटा>वटा>वटा, ओला>वला>वला,
ओघय>वघय>वघर, कोवळा>कव्वा>कव्रा,
भोवरा>भव्रा>भव्रा.

ओ>लोप = आटोपला>(अटोप्ला)>अटप्ला,
कासोटा>कास्टा>कास्टा,
निरोप>(निरोप्)>निरप्, मासोळी>(मासोई)>मास्री.

( ८ ) प्रमाण मराठीतील विसर्ग दोन्ही बोलीत आढळत नाही. त्याऐवजी पुढील प्रक्रिया आढळते.

अ:>ओ = स्वत:>सोता>सोता.

विसर्गाचा लोप = दु:ख>दुक्/दुख्>दुख्.

( ९ ) प्रमाण मराठीत मध्य आणि अंत्यस्थानी येणाऱ्या 'अव'चा उच्चार 'ओ' होतो. तसेच, 'इय'चा 'ए' होतो.

अव>ओ =

मध्यस्थानी : भरवसा>भरोसा>भरोसा/(भरुसा),
वरवंटा>वरोटा/(वरुटा)>वरोटा/(वरुटा).

अत्यंस्थानी : माधव>माधो>माधो, यादव>यादो>यादो,
राघव>राघो>राघो.

इय>ए = नियम>नेम्>नेम्.

**व्यंजन प्रक्रिया :**

( १ ) प्रमाण मराठीतील शब्दांतर्गत येणाऱ्या 'क'चा दोन्ही बोलीत 'ग' होतो.

क>ग = कोबी>गोबी>गोबी, भक्त>भगत्>भगत्, शकुन>सगून्>सगून्.

( २ ) शब्दांतर्गत येणाऱ्या 'ख'चा वऱ्हाडीत 'क होतो तर, नागपुरीत 'क', 'ग' होतो.

ख>क = साखर>साकर्>साकर्, सुख>सुक्>सुक्.

ख>ग = खडा>(खळा)>गडा, खडीसाखर>(खळीसाकर्)>गडिसाकर्.

( ३ ) प्रमाण मराठीतील अनुनासिकानंतर येणाऱ्या आद्येतर 'ग'चा नागपुरीत लोप होतो वा तो उदासीन उच्चारला जातो. मात्र, वऱ्हाडी बोली प्रमाण मराठीला अनुसरते.

उदा० अंगणात>आंगनात>आंनात, चांगला>चांग्ला>चांला, रंग>रंग>रं(ग्), सांग>सांग>सां(ग्).

( ४ ) आद्यतर 'च' दोन्ही बोलीत 'स' होतो. तसेच, इतरत्र शब्दांतर्गत येणाऱ्या 'च'चा उच्चार नागपुरीत 'त' होतो; तर वऱ्हाडी 'च'चा तालव्य उच्चार करते.

च>स = खिचडी>खिस्ळी>खिस्डी, खोचने>खोस्नं>खोस्नं, खोचा>खोसा>खोसा, भाचा>भासा>भासा, खर्च>(खर्च)>खर्स.

च>त = अठ्ठेचाळीस>(अठ्ठेच्याळीस्)>अठ्ठेतालीस्, एकेचाळीस>(येकेच्याळीस्)>एक्तालीस्.

( ५ ) शब्दारंभी येणाऱ्या 'छ'चा नागपुरीत 'स' होतो; वऱ्हाडीत मात्र, 'छ'चा उच्चार आढळतो.

उदा० छपरी>छप्री>सप्री, छटाक>छटाक्>सटाक्.

नागपुरीत होणारा हा स'चा उच्चार 'छ स'मधला आहे. स्पष्ट सकार नाही.

( ६ ) शब्दांतर्गत 'ज' तदनंतर येणाऱ्या दीर्घ स्वरान्त 'च'च्या प्रभावामुळे 'च' असा उच्चार दोन्ही बोलीत आढळतो.

उदा० आजचा>आच्चा>आच्चा, रोजचा>रोच्चा>रोच्चा.

'ज'प्रमाणेच 'ट','ठ','त','थ' या निराघात वर्णाचाही 'च'सदृश उच्चार होतो.

उदा० कोठचा>(कुठ्चा)>कोच्चा, तेथचा>तच्चा>तेच्चा, रातचा>राच्चा>राच्चा, वाटचा>(वाटचा)>वाच्चा.

प्रमाण मराठीतील दंततालव्य 'ज'चा उच्चार वऱ्हाडीत दंततालव्य होतो, तर नागपुरीत तालव्य होतो.

जवळ>जोळ्>ज्यवर्, जातो>जातो>ज्यातो. परंतु, हा प्रकारही नागपुरीत अपवादानेच आढळतो.

( ७ ) प्रमाण मराठीतील 'झ'चा 'ज', 'स' होण्याची प्रक्रिया नागपुरीत अपवादात आढळत असेल, मात्र वऱ्हाडीत 'झ'चा 'ज' होण्याची प्रक्रिया कोणत्याच शब्दात आढळत नाही. झ>स ही प्रक्रिया वऱ्हाडीतही क्वचित आढळते. प्रत्ययरूपात्मक 'झ' दोन्ही बोलीत लोप पावतो.

झ>ज = झोप>(झोप्)>जप, झोपाळू>(झोपाळू)>जपूरा.

झ>स = झपाटा>सपाटा>सपाटा,

झपाट्याने>सपाट्यानं>सपाट्याने,

झटकन>सट्कन्>सट्कन्,

झ>लोप = तुझा>तुया>तुहा, माझा>माया>माहा.

प्रमाण मराठीतील दंततालव्य 'झ'चा उच्चार वऱ्हाडीत दंततालव्य तर, क्वचित नागपुरीत तालव्य उच्चारला जातो.

उदा० झाड>झाळ्>झ्याड्, झटक>झटक्>झ्याटक्.

( ८ ) 'ट'चा वऱ्हाडीत 'ळ' तर नागपुरीत 'ड' होतो.

ट>ळ>ड = उपट>उपळ्>उपड्, भटजी>भळ्जी>भड्जी.

( ९ ) 'ठ'च्या ऐवजी 'ट', 'ड'चा उच्चार नागपुरीत होतो. वऱ्हाडीत संबंधित काही शब्दातील 'ठ'चा उच्चार कायम राहतो. तर, काही शब्दात 'ळ', 'ट' होतो.

उदा० ठ>ट = ओठ>(ओठ्)>होट्, गोठते>गोट्टे>गोट्टे,

पीठ>(पीठ्)>पीट्, साठी>(साठी)>साटी.

ठ>ळ>ड = काठी>काळी>काडी.

(१०) 'ड'चा वऱ्हाडीत 'ळ' तर नागपुरीत काही शब्दात 'ड', 'र' (अभ्यस्त शब्दात), 'ट' होताना आढळतो.

ड>ळ>ड् = झडतो>झाळ्तो>झाड्टो.

ड>ळ>र् = गडबड>गळ्बळ्>गर्बड्, धडपळ>धळ्पळ्>धर्पड्.

ड>ळ>ट = कापड>कापळ्>कापट.

(११) 'ढ'चा वऱ्हाडीत 'ळ' तर नागपुरीत 'ड' होतो.

ढ>ळ>ड = काढ>काळ्>काड्, चढ>चळ्>चहड्, वाढ>वाळ्>वाहाड्,

काढतो>काळ्तो>काहाड्टो, वाढतो>वाळ्तो>वाहाड्टो.

(१२) 'त'चा 'च', 'ट', 'थ' दोन्ही बोलीत होताना आढळते.

त>च = रातचा>राचा>राचा, सातचा>साचा>साचा.

त>ट = ताट>(ताट्)>टाट्, तिकीट>(तिकीट्)>टिकट्,
वाटते>वाट्टे>वाट्टे, भेटते>भेट्टे>भेट्टे, सुटते>सट्टे>सुट्टे.

त>थ = म्हातारा>मथारा>मथारा, म्हातारी>मथारी>मथारी,
तो>(तो)/थो>थो, ते>(ते)/थे>थे, त्या>(त्या)/थ्या>थ्या.

अमरावती जिल्ह्यात 'तो', ती', 'ते' ह्या सर्वनामांचा उच्चार अनुक्रमे 'थो', 'थी', 'थे' होतो.

(१३) 'थ'चा दोन्ही बोलीत 'त' होतो; तर नागपुरीत काही शब्दांत 'ठ' होतो.

थ>ठ = थाटमाट>(थाट्माट्)>ठाट्माट्, माथवट>(मथाटी)>मठाटी.

थ>त = काथ>कात्>कात्, लाथ>लात्>लात्,
कुंथतो>(कुथ्थो)>कुत्तो, साधते>सात्ते>सात्ते.

(१४) शब्दारंभी येणाऱ्या 'द'चा दोन्ही बोलीत 'ड' होताना दिसतो. मात्र, नागपुरीपेक्षा वऱ्हाडीत ही प्रक्रिया अल्पप्रमाणात आढळते. प्रमाण मराठीत शब्दांतर्गत आढळणारा 'द'चा दोन्ही बोलीत लोप होतो.

द>ड = दाटन(गर्दी)>(दाटन्)>डाटन्, द्रोण>डव्ना>डोना,
दुपट्टा>(दुपट्टा)>डुपट्टा, देठ>(देठ्)>डेठ्.

द>लोप = चांदणी>चान्नी>चान्नी, नांदते>नान्ते>नान्ते.

(१५) 'ध'चा नागपुरीत 'ढ', 'द, 'त' होतो; तर वऱ्हाडीत 'द', 'त' होतो.

ध>ढ = धुपट>(धुपट्)>ढुपट्, मंधवट>...>मंढ्वट्,

ध>द = औषध>अव्शीद्>अव्शीद्, घरामध्ये>(घरात्नी)>घरामंदी,
दूध>दूद्>दूद्, श्राद्ध>सराद्>सराद्द.

ध>त = बांधते>बांत्ते>बात्ते, साधते>सात्ते>सात्ते.

(१६) शब्दांतर्गत 'न'नंतर 'म' हा वर्ण येत असेल, तर 'न'चा 'ल' होतो.
उदा० जन्म>जल्म>जलम्, बदनाम>बद्लाम्>बद्लाम्.
प्रमाण मराठीतील उनान्त शब्द जेव्हा द्विरुक्त होऊन नागपुरीत येतात तेव्हा त्या दोन्ही शब्दांच्या अंती असलेला 'न'कार नागपुरीत लुप्त होतो.

जसे - करूनकरून>करूकरू>करूकरू, पाहूनपाहून>पाहपाहू>पाहूपाहू,
बोलूनबोलून>बोलूबोलू>बोलूबोलू, सांगूनसांगून>सांगू>सांगू.





अनुक्रमणिका

(१७) शब्दांतर्गत येणाऱ्या 'प'चा दोन्ही बोलीत 'ब' तर, काही शब्दांत नागपुरीत 'फ' होतो.

प>ब = कपबशी>कब्बसी>कब्बसी.

प>फ = आपण>(आपून्)>आफून्, दुपार>(दुपार्)>दुफार.

(१८) 'फ'चा नागपुरीत 'प' होतो. तर वऱ्हाडीत ही प्रक्रिया नागपुरीपेक्षा कमी प्रमाणात आढळते.

फ>प = तडफ>तळप्>तडप्, फावडे>(फाव्ळ)>पाव्‌ड,
वाफ>(वाफ्)/वाप्>भाप्, साफसूफ>साप्‌सूप्>सापसूप्.

(१९) शब्दांती येणाऱ्या 'य'चा दोन्ही बोलीत 'व' होतो; तर संयुक्त अक्षरातील 'य'चा दोन्ही बोलींत लोप होतो.

य>व = अन्याय>(अन्याय)>अन्याव्, अपाय>उपाव्>उपाव्,
भय>भेव्>भेव्.

य>लोप = नैवेद्य>निवद्>निवद्, पथ्य>पथ्>पऽथ्.

प्रमाण मराठीतील खायाचे, जायचे, द्यायचे, द्यावयाला, यावयाला ह्यांसारख्या धातुरूपातील प्रत्ययपूर्व 'य'काराचा लोप होतो.

उदा० खायाचे>खाचे>खाआचं, जायचे>जाचं>जाआचं,
द्यायचे>द्याचं>द्यायचं, न्यायाला>न्याले>न्याआले.

य>आगम = सामान>सामायन>समायन्, घाबरला>घायबरला>घाय्‌बर्‌ला.

(२०) 'ड' पूर्वी, 'र' आल्यास ह्या 'र'चा वऱ्हाडीत 'ळ' तर, नागपुरीत 'ड' होतो. मात्र, 'ट', 'ठ' पूर्वी जर 'र' येत असेल तर दोन्ही बोलींत 'र'चा 'ट', 'ठ' होतो.

र>ळ>ड = कोरडा>कोळ्ळा>कोड्डा, भरडा(सुपारी)>भळ्ळा>भड्डा,
सरडा>सळ्ळा>सड्डा, हुरडा>हुळ्ळा>हुड्डा.

र>ट = चोरटा>चोट्टा>चोट्टा, तुरटी>तुट्टी>तुट्टी.

र>ठ = दारवंटा>दाठ्ठा>दाठ्ठा, वरठा(धोबी)>वठ्ठी>वठ्ठी.

स्ट>ठ = स्टेशन>ठेसन्>ठेसन्.

(२१) 'ड' पूर्वी 'र' आल्यास त्याचा नागपुरीत 'ल' होतो. वऱ्हाडीत ही प्रक्रिया काही शब्दांत आढळते.

ड>ल = रोड>लोळ्>लोड्, रळ्>लळ्>लड्.

(२२) शब्दारंभी येणाऱ्या 'व' हा 'ए' स्वरयुक्त असल्यास त्याचा 'य' होतो. तसेच 'इ/ई' स्वरांतर्गत व सयुक्त अक्षरात येणाऱ्या 'व'चा लोप दोन्ही बोलीत होतो.

व>य = वेडा>येळा>येडा, वेसण>येसन्>येसन्.

व>लोप = विचरा>इचार्>इचार्, विमान>इमान्>इमान्,
विस्तव>इस्तू/इस्तो>इस्तो/इस्तू,
वीट>ईट>ईट्, वीस>ईस्>ईस्.
ज्वर>(ज्वर्)>जऽर, स्वस्त>सस्त>सस्त.

(२३) 'श'चा दोन्ही बोलीत 'स' होतो. तसेच, नागपुरीत काही शब्दात 'छ' उच्चार होतो.

श>स = उशीर>(उशीर्)>उस्रा, नशीब>नसीब्>नसीब्,
नाश>नास्>नास्, शाप>सराप्>सराप्,
स्मशान>मसन्>मसन्.

श>छ = शेठ>(शेठ्)>छाट्, शेकडा>(शेकळा)>छकडा,
शेहेचाळीस>(शेच्याळीस्)>छेचाळीस्.

(२४) संयुक्त अक्षरात येणाऱ्या 'श'चा 'स' होतो.
उदा० विश्वास>इस्वाद्>इस्वाद/इस्वाद्, श्वास>सास्>सास्
श्रावण>सरावन्>सरावन्.

(२५) 'ष'चा उच्चार दोन्ही बोलीत 'श' किंवा 'स' होतो.

ष>श/स = उष्टे>उस्टं>उस्टं, कष्ट>कस्ट>कस्ट, खुष>खूस्>खूस्,
विष>ईस्/वीस्>ईश/ईस्, संतोष>संतोस>संतोस्.

(२६) प्रमाण मराठीतील सर्वनामात येणारा 'झ'चा उच्चार नागपुरीत व वऱ्हाडीतील काही भागात 'ह' होतो. शब्दांतर्गत येणाऱ्या महाप्राण 'ह'चा उच्चार वऱ्हाडीत अर्धस्वर 'य' होतो.

झ>ह = तुझा>(तुया)/तुहा>तुहा, माझा>(माया)/माहा>माहा.

ह>य = महिने>मयूने>(मह्यने), राहिला>रायला>(राह्यला).

प्रमाण मराठीतील द्वयक्षरी 'ढ'कारान्त शब्द (आज्ञार्थी क्रियापद) उच्चारले जात असताना नागपुरीत शब्दांतीच्या 'ढ'चा 'ड' असे अल्पप्राण उच्चारण होऊन तत्पूर्वी 'ह'काराचा आगम होतो. तसेच, वऱ्हाडीत शब्दांतर्गत येणाऱ्या महाप्रमाण 'ह'चा लोप होतो.

आगम = ओट>(ओळ्)>वहड्, काढ>(काळ्)>काहाड्,
जढ>(जळ्)>जहड्, वाढ>(वाळ्)>वाहाड्.

लोप = आम्हाला>आमाले>(आम्हाले), आहे>आय्>(हाये),
कहाणी>कायनी>(काह्यनी), तहान>तान्>(ताहान्),
पाहा>पाय्>(पाह्य), वाहता>वायता>(वाह्यता),
लहान>लान्/लायना>(लाहान्).

(२७) ‘क्ष’चा दोन्ही बोलींत ‘क’ होतो.

क्ष>क = भिक्षा>भीक्>भीक्.

(२८) ‘ज्ञ’चा आजच्या वऱ्हाडीत ‘ज्ञ’ असा उच्चार आढळतो. ज्ञानेश्वर नावाच्या मुलाला कोणीही ‘ग्यानेश्वर’, ‘जानेश्वर’ असा उच्चार ऐकलेला नाही. मात्र, ‘ज्ञान’ शब्दाचा ‘ग्यान्’ असा उच्चार म्हाताऱ्या माहीतगारांच्या उच्चारात आढळतो. फार पूर्वी ‘ग्यान्बा तुकाराम’ असे म्हणत असत. मात्र, नागपुरी ‘ज्ञ’ऐवजी ‘ज’, ‘ग्य’ असा उच्चार आढळतो.

ज्ञ>ज = ज्ञानबा>(ग्यान्बा/ज्ञान्बा)>जान्बा, ज्ञाता>...>जानृता.

ज्ञ>ग्य = ज्ञान>ग्यान्>ग्यान्, ज्ञानबा>ग्यान्बा/(ज्ञान्बा)>ग्यान्बा.

(२९) वऱ्हाडीत ‘ळ’चा प्राचुर्याने उच्चार होतो काढ>काळ्, झाड>झाळ् इ० मात्र, नागपुरीत ‘ळ’चा (‘घळ्ळी’ हा अपवाद सोडल्यास) उच्चार होत नाही. प्रमाण मराठीतील काही शब्दात येणाऱ्या ‘ळ’चा वऱ्हाडीत ‘य’ होतो, तर नागपुरीत गोंडीच्या प्रभावाने ‘र’ होतो.

ळ>य र् = आवळा>(आव्ळा)>आव्रा, काजळ>काजय्>काजर्,
काळा>काया>कारा, कोळसा>कोय्सा>कोर्सा,
खिळा>(खिवा)>खिरा, गंगाळ>गंगाय्>गंगार्,
पिळा>(पिळा)>पिरा, मळ>मय्>मर् इ०

**अनुनासिके :**

‘ङ्’चा दोन्ही बोलींत उच्चार आढळतो. शब्दांती वा उपान्त्यस्थानी येणाऱ्या निराघात ‘ग’च्या सान्निध्यात तो आपल्या मूळ स्वरूपात आढळतो.

उदा० अंगणात>आंगनात्>आङ्नात्, चांगला>चांगला>चाङ्ला,
रंग>रंग>रङ्(ग्), सोंग>सोंग>सोङ्(ग्)

**अनुनासिकांचा लोप :**

प्रमाण मराठीतील काही शब्दांत येणाऱ्या अनुनासिकाचा लोप दोन्ही बोलींत होतो. तसेच, काही शब्दांत जेथे अनुनासिकाचा उच्चार होत नाही, तेथेही ह्या दोन्ही बोलींत उच्चार होताना आढळतो.

**अनुनासिकाचा लोप :** उंच>उच्>उच्, कुंकू>कुकू>कुकू, घडवंची>घळोशी>घडोशी,
चिंच>चीच्>चीच्, चिंचोका>चिचोरा>चिचोरा,
भिंत>भीत्>भीत्, मांजर>माजर्>माजर्,
रांजण>राजन्>राजन्, विंचू>इचू>इचू,
स्वयंपाक>सय्पाक्>सय्पाक

**अनुनासिकाचा आगम :** उद्या>(उद्या)>उंद्या, मग>मंग>मंग, माग>मांग>मांग,
निघ>निंघ>निंघ, पूजा>(पुज्या)>पुंजा.

**संयुक्त व्यंजने :**

**शब्दारंभी येणारी संयुक्त व्यंजने :**

(१) प्रमाण मराठीतील प्रथमाक्षरातील संयुक्त व्यंजने दोन्ही बोलींत स्वराचे आगम होऊन असंयुक्त बनतात.

उदा० त्रास>तरास्>तरास्, भ्रम>भरम्>भरम्, व्रत>वरत्>वरत्,
व्रण>वन्>वरन्, स्वाद>सवाद्>सवाद्.

(२) संयुक्त व्यंजनातील उत्तरस्थानीय 'व'चा लोप होऊन.
स्वभाव>सभाव्>सभाव्, स्वयंपाक>सयपाक्>सयपाक्,
स्वरूप>(रूप्)>सरूप्.

**शब्दांतर्गत येणारी संयुक्त व्यंजने :**

प्रमाण मराठीतील शब्दाचा उच्चार दोन्ही बोलीत आंतस्वरलोपामुळे होत असल्याने नवे व्यंजन संयोग निर्माण होतात.

उदा० सोमवार>सोम्मार, मामेभाऊ>माम्भाऊ>माम्भाऊ,
चुगली>चुग्ली>चुग्ली, चुलता>चुल्ता>चुल्ता.

**शब्दांती येणारी संयुक्त व्यंजने :**

(१) वर्णलोपाद्वारे : वैद्य>वईद्>वईद्, नैवेद्य>निवद्>नवेद्/निवद्,
पथ्य>पथ्>पथ्, हद्द>हद्>हद्, जिद्द>जीद्>जीद्.

(२) वर्णागमाद्वारे : फक्त>फकत्>फकत्, भक्त>भगत्>भगत्,
रक्कत>रगत्>रगत्. इ०

अशा प्रकारे वऱ्हाडी आणि नागपुरी बोलीतील स्वनप्रक्रिया उलगडून दाखवता येते.

**संदर्भ :**


( १ ) देसाई, बापूराव, 'महाराष्ट्रातील समग्र बोलींचे लोकसाहित्यशास्त्रीय अध्ययन', अनघा प्रकाशन, पुणे, २००६.

( २ ) वऱ्हाडपांडे, वसंत, 'नागपुरी बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास', इंदिरा प्रकाशन, नागपूर, १९७२.

( ३ ) सोटे, देविदास, 'वैदभी बोलीचा शब्दकोश', साटे साहित्य संस्था, वर्धा, १९७४.


■

पुनर्भेट

# महाराष्ट्र-शब्दसंपत्ती व शब्दभांडार

चिंतामण गणेश कर्वे

सर्व संपत्तीत भाषासंपत्ती ही अधिक शाश्वत आणि उपयुक्त असून निरंतर वाढत जाणारी पण असते. जसे व्यक्तीस आपले विचार आणि भाव दुसऱ्यास कळविण्या-साठी भाषेचे माध्यम अत्यावश्य, तसेच राष्ट्रासही आपला दर्जा, गरजा आणि आकांक्षा जगताला कळविण्यासाठी एक विशिष्ट राष्ट्र-भाषा उपयोजावी लागते. ज्या राष्ट्राला स्वत:ची भाषा आणि वाङ्मय नाही त्याचा सांस्कृतिक दर्जा निकृष्ट समजला जाणे साहजिक आहे; कारण संस्कृतीच्या इतिहासांत भाषा या मोठ्या सूचक आणि मार्गदर्शक असतात. भाषाभेदांवरून समाजाचा प्रस्थान भेद उघडकीस येतो. भाषेतील विशिष्ट शब्द हे प्रयाणमार्गाच्या जणू काय पाट्या(Sign-board)च होत व अपभ्रष्ट शब्द हे निरनिराळ्या प्रयाणकालांचे दर्शक स्तंभच म्हणता येतील. यासंबंधात जिप्सी लोकांचे उदाहरण मोठे उद्बोधक वाटेल. जिप्सी हे इजिप्तमधून आले असावेत असा तर्क करून त्यांना तद्देशसंज्ञक (इजिप्तेर) असे नाव देण्यात आले आणि त्यांच्या गूढ आणि अज्ञात रहाणीवरून त्यांना पाश्चात्त्यांनी निंद्य ठरविले! पण पुढे जसजसा त्यांच्या भाषेचा अभ्यास होऊ लागला तसतसा त्यांच्याविषयी गैरसमज दूर होत जाऊन आज हे जिप्सी आपले दहा शतकांमागील भाऊबंद ठरू पाहात आहेत. जिप्सी भाषेतील संस्कृतोद्भव, हिंदी, फारसी, तुर्की, ग्रीक, स्लाव्ह इत्यादी शब्द त्यांचा हिंदुस्थानातून युरोपकडे गेलेला प्रयाणमार्ग निश्चयाने दर्शवितात. गुजराथी-राजस्थानी भाषांची जी जननी तीच जिप्सी भाषेचीही जननी असा शोध अनेक भाषाशास्त्रीय पुराव्यांनिशी रा० रमणभाई यांनी लावून जिप्सींना आपणां मराठ्यांचे प्रत्यक्ष नाही तरी अप्रत्यक्षतः भाईबंद ठरविले आहेत. कारण ज्ञानेश्वरकालीन 'बागलाणी' मराठीचा प्रकार पाहिला म्हणजे 'मऱ्हाठी व गुजराथी या दोन भाषा एकाच भाषेची रूपांतरे होत' असे खात्रीलायक वाटू लागते. (रा० गोविंद नारायणशास्त्री दातार-ज्ञानेश्वरमहाराजांच्या अभंगांची गाथा, प्रस्तावना.)

मराठी भाषेची जननी संस्कृत की प्राकृत, की संस्कृत प्राकृत दोन्ही असा वाद आज बरेच दिवस भाषाशास्त्रीय पंडितांत चालू आहे. आर्यन आणि आर्यापूर्वीचे भरतखंडांत वास करणारे एतद्देशीय यांच्या बोलींपासून आजची मराठी निघाली यांत संशय नाही. मराठीतल्या काही शब्दांवरून त्यांची कुळी लक्षात येते. उदाहरणार्थ 'मी' या प्रथम पुरुषी सर्वनामाची वंशावळ -




यावरून मराठी जोपासून निघाली ती महाराष्ट्री भाषा संस्कृत भाषेची मावशी होते. पुढे पुढे अर्वाचीन मराठीने संस्कृतशी अति निकट व्यवहार ठेवून आपले संस्कृतसंभव शब्दभांडार वाढविले, म्हणून आज संस्कृतचे मराठीशी नाते मायलेकीप्रमाणे भासते. महाराष्ट्री भाषा ही सर्व प्राकृत भाषांत उत्कृष्ट समजली जात असून तिचा उपयोग लौकिक व्यवहारात-गाणी, नाटके, आख्याने वगैरेत होत असे. हिची सख्खी बहीण जी जैन-महाराष्ट्री तीच जैनांची ग्रंथभाषा होय. महाराष्ट्री इ० सनाच्या ८व्या शतकापर्यंत दक्षिण महाराष्ट्रात रूढ होती. पुढे ती कानडी आणि मराठी भाषांत विलीन पावली. पहिला मराठी लेख जो आतापावेतो उपलब्ध आहे तो ८व्या शतकातील चिकुडे येथील ताम्रपट होय. त्यात मराठीचे त्या काळचे स्वरूप-संस्कृत महाराष्ट्रीपासून अलग होत असताना तिची अवस्था-चांगले दृष्टोत्पत्तीस येते. या ताम्रपटात काही शब्द आणि प्रत्यय कानडी आहेत. उदाहरणार्थ - बहुवचनी लु (ळु) हा प्रत्यय '५ रात्रेयलु' (=पंचरात्र आगमाचा अनुयायी); 'गंड' (गंडा=श्रेष्ठ, नवरा) हा शब्द (हा शब्द घेऊन 'कानडीने केला मराठा भ्रतार' या उक्तीचा खरेपणा तुकारामांनी शब्दशः पटवून दिला नसेलना!); 'माड' (कानडी माडु) इ० म्हणजे कानडीतील शब्दभांडारावर मराठीचा हल्ला त्या वेळीही चालू होताच. ज्ञानेश्वरांच्या बागलाणी अभंगांवरून गुजराथीच्या बाबतीत हीच गोष्ट दिसून येते.

महाराष्ट्रीप्रमाणे पाली, अर्धमागधी, अपभ्रंश इत्यादि प्राकृत भाषांपासूनही मराठी भाषा तयार झाली आहे. उत्तर कोकणातील मांगेले तांडेले, वारली या जाती मूळच्या आंध्र व विंध्य प्रदेशांतल्या असून त्यांनी दक्षिणेत येताना महाराष्ट्रीसदृश भाषा बरोबर

आणली व पुढे त्यांची ही भाषा मराठी झाली. तेव्हा वारल्यांची मराठी आणि पुणे-सातारी मराठी अर्थात् भिन्न असणार. अशीच गोष्ट कातवड्यांची आहे. त्यांची मूळची भाषा द्राविडी किंवा एखादी अनार्य असून पुढे आर्यसंगतीने मराठी बनली. आज कातवडी-मराठी ही भाषाशास्त्रीय दृष्टीने अभ्यासावयास पाहिजे. सध्याच्या महाराष्ट्राची एक अशी भाषा केव्हाही नव्हती, आता नाही व पुढेही नसणार हे निर्विवाद आहे. याचे मुख्यत: कारण महाराष्ट्र कोणत्या एकाच जातीचा, धर्माचा किंवा आचारविचाराचा नाही. अनेक विसदृश जातिसमूह आणि त्यांचा अशाच इतर अनेक विसदृश सीमाप्रदेशस्थ जातिसमूहाशी घडणारा नित्य व्यवहार; तेव्हा एकजिनसी भाषा राहावी कशी? दोन हजार वर्षांपूर्वीही मराठीची जननी जी महाराष्ट्री भाषा तिचेदेखील अंतस्थ व सीमाप्रदेशस्थ शेकडो भाषापुंज आजच्या महाराष्ट्रप्रांतात वावरत होते. नागपुरी, अलजपुरी, वऱ्हाडी, खानदेशी, पैठणी, नाशिकी, पुणेरी, भिमथडी, बालेघाटी, नगरी, कोल्हापुरी, मावळी अशा अनेक अंतस्थ प्रांतिक भाषापुंजांभोवती मांगेली, वारली, ठाकरी, कातकरी, कोळी, कुणबी, पातेणी, चित्पावनी, कऱ्हाडी, सारस्वती, गोमांतकी, गोकर्णी, सोंधेकरी, मिरजी, पंढरपुरी, मंगळवेढी, बेदरी, नांदेडी, रायपुरी, मूळतापी, लाडी वगैरे प्रांतिक व जातिक भाषापुंजांचा वेढा पडला होता. म्हणजे इतक्या उपभाषांचा समावेश आजच्या मराठीत झालेला असला पाहिजे. (महिकावती बखर पाहा.)

आज सातारी, पुणेरी, कोल्हापुरी, नगरी, बागलाणी, खानदेशी, अहिराणी, बालेघाटी, वऱ्हाडी, गंगथडी, वैतुली, नागपुरी या अंतस्थ मराठी भाषांभोवती हिंदी, गुजराथी, गोंडी, तेलगु, कानडी या प्रधान भाषांचा फेर आहे. तेव्हा त्यांचा परिणाम अंतस्थ मराठी भाषांवर झाल्यावाचून राहिला नाही.

पुढे महाराष्ट्राच्या राजकीय परिस्थितीमुळे अरबी, फारसी आणि युरोपियन भाषांशी संबंध जडून त्याही भाषांतील बरेचसे शब्द मराठीने आत्मसात केले. मराठी भाषासंपत्तीत आजपावेतो अनेक विविध भाषोपभाषांची भर पडत आलेली आहे व ती पुढे अशीच पडत जाणार. तेव्हा या भाषेत परकी शब्दांचे शेकडा प्रमाण काय आहे हे ठरविणेही अवघड झाले आहे. मराठी शब्दरत्नाकराचे कर्ते श्री० वासुदेवराव आपटे यांनी त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत आजच्या मराठी भाषेतील शब्दांचे वर्गीकरण अनुमान धक्क्याने का होईना पुढीलप्रमाणे केले आहे : ''शुद्ध संस्कृत शब्द शे. १४; किंचित् विकार पावून मराठींत आलेले संस्कृत शब्द शे. १८; प्राकृत भाषांच्या द्वारे आलेले शे. ३०; देशज व निवळ प्रादेशिक शे. १६; कानडी शे. २; गुजराथी शे. १/२; तामिल व तेलगु फार थोडे (उपेक्षणीय); हिंदी शे. १/२; यावनी (अरबी, फारशी वगैरे) शे. १७; पाश्चात्त्य भाषेतले (इंग्रजी, पोर्तुगीज वगैरे) शे. ३; अवर्गीकृत शे. ९. आतां यापुढे फक्त संस्कृत, हिंदी आणि इंग्रजी शब्दांची जास्त जास्त भर पडत जाईल. यावनी शब्द कमी होत जातील,

प्राकृत तर नवीन मुळीच येणार नाहीत.''

अशा प्रकारच्या संमिश्र महाराष्ट्र भाषासंपत्तीच शब्दभांडार पाहणे अवश्य होऊन बसते. तो एक स्वतंत्र विषयच होऊन बसेल इतका महत्त्वाचा आहे. भांडारात शब्दरत्ने किती आहेत हे मोजावयाचे झाल्यास कोशाच्या करंडकाकडे वळले पाहिजे. मराठीचा सर्वांत मोठा कोश, आजतागायत उपलब्ध असलेला म्हणजे मोलस्वर्थ-कँडीचा मराठी-इंग्रजी कोश (दुसरी आवृत्ति इ० सन १८५७) होय. यांत शक्य तितके जास्त शब्द घालण्याचा प्रयत्न केला असूनही शब्दसंख्या सुमारे साठ हजारच भरली. पहिल्या आवृत्तीत (इ० सन १८३१) वीस हजार शब्द कमीच आहेत. यावरून कोशगत शब्द साठ हजार आहेत व त्यांत न आलेल्या सर्व विद्यमान-प्राचीन, अर्वाचीन, प्रांतिक भाषांतील, कारागिरी-शब्दांची मिळवणी केल्यास बेरीज एक लाखावर जाईल असा अंदाज आहे.

वास्तविक पाहतां ही एका लाखाची संपत्ती मोठी स्पृहणीय व अभिमानास्पद नाही. कारण युरोपांतील इंग्रजीसारख्या जगज्जेत्या भाषांकडे पाहिल्यास आपली भाषा खुरटी आणि अशक्त दिसते. इंग्रजी भाषेत सुमारे पांच लाखांवर शब्द आहेत. तिच्या संपत्तीची वाढ फार झपाट्याने होते आहे हे महायुद्धापूर्वीची व नंतरची इंग्रजी भाषा यांची तुलना करून पाहिल्यास चट्दिशी कळणार आहे. इंग्रजी शब्दभांडारात जगातील बहुतेक सर्व भाषांतील शब्द साठविलेले दिसतील. प्रादेशिक लोभाप्रमाणेच इंग्रजांचा शब्दलोभही बेसुमार आहे. त्यामुळे दर दहापंधरा वर्षांनी नवीन वाढीचे शब्दकोश त्यांच्यात होतात. इतर बाबीत ज्याप्रमाणे त्याचप्रमाणे या बाबीतही जर आपण आंग्लानुकरण केले तर स्वभाषासंवर्धन चांगले होऊन साहित्यही सुधारेल. शास्त्रीय परिभाषांची या कामी अतिशय मदत होणार आहे. सर्व शास्त्रांतील आणि धंद्यांतील शब्द मराठीत अंतर्भूत केल्यास शब्दसंख्या दुप्पटीवर वाढेल. त्याचप्रमाणे वऱ्हाडी, कोंकणी यांसारख्या प्रांतिक भाषांतील शब्द - जे वस्तुत: आपलेच आहेत - आपले म्हणून आनंदाने स्वीकारले पाहिजेत. असे करताना दृष्टी व्यापक आणि उदार ठेवावी लागेल; पण ती ठेवणे नि:संशय हिताचे आहे.
[ संदर्भ : 'रत्नाकर', ऑगस्ट १९२९, पृ० ६३१ ते ६३५मधील संपादित भाग. प्रेषक - माधव चिं० कर्वे ]

■

**स्वागत**

(१) 'गाव शिवारा', केशव बा० वसेकर, प्रतिभास प्रकाशन, परभणी, २०११

(२) 'मराठीसाठी लोकनागरी', पुष्पा फडके, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०१२, पृष्ठे ४८०, मूल्य रु० ४५०/-

# काकतालीय न्याय

केवळ योगायोगाने म्हणजेच यदृच्छेने जेव्हा एखादी गोष्ट घडते तेव्हा 'कावळा बसायला आणि फांदी तुटायला एक गाठ पडली' असं म्हटलं जातं. खरं म्हणजे कावळ्याच्या वजनानं फांदी तुटलेली नसते तर केवळ योगायोगाने तसं घडलेलं असतं. यावरूनच 'कावळा बसायला आणि फांदी तुटायला एक गाठ पडणे' असा वाक्प्रचार रूढ झाला आहे. तो संस्कृतमधील काकतालीय न्यायावरून आला आहे.

काक म्हणजे कावळा, तर ताल म्हणजे ताड वृक्ष. ताल याचा फांदी असा अर्थ शब्दकोशांत नाही. त्यामुळे काकतालीय न्यायाचा खरा अर्थ कावळा बसायला आणि ताडवृक्ष कोसळायला एक वेळ येणे असा होतो. (काही तज्ज्ञांच्या मते ताडाचे फळ पडणे असाही अर्थ होतो.)

परंतु ताल या संस्कृत शब्दाचे टाळी तसेच तळहात असेही अर्थ कोशांत दिलेले आहेत. त्यामुळे काकतालीय न्यायाचा 'टाळी वाजवावी आणि त्या कावळा सापडावा' असाही अर्थ होऊ शकतो. तुम्ही म्हणाल, ''काहीही काय सांगताय, असा कुठे वापर झालेला आढळलाय का?'' तुम्हाला आश्चर्य वाटेल, अशा अर्थाचा वापर चक्क ज्ञानेश्वरांनी केलाय. सतराव्या अध्यायातील ''विपाये घुणाक्षर पडे ॥ टाळियां काऊळा सापडे ॥ तैसां तामसा पर्व जोडे ॥ तीर्थ देशी'' ॥१७,३०१॥ ह्या ओवीत तसा अर्थ आढळतो. ह्या ओवीचा अर्थ मामासाहेब दांडेकर संपादित 'ज्ञानेश्वरी'त पुढीलप्रमाणे दिला आहे. 'लाकूड कोरणाऱ्या घुणा नामक किड्याने लाकूड कोरताना नकळत अक्षरे कोरली जावीत अथवा टाळी वाजविताना तीमध्ये क्वचित कावळा सापडावा त्याप्रमाणे तमोगुण्याला पुण्यस्थळी पर्वकाळाची संधी क्वचित प्राप्त व्हावी.'

ही ओवी तामसदानासंदर्भात आहे. ह्या ओवीच्या पहिल्या आणि दुसऱ्या चरणांत, घुणाक्षर न्याय आणि काकतालीय न्याय, असे दोन्ही एकाच अर्थाचे न्याय दृष्टांत म्हणून दिले आहेत, ही गोष्ट सहज लक्षात येते. दोन्हींचा अर्थ यदृच्छेने म्हणजेच योगायोगाने एखादी गोष्ट घडणे असा आहे. पैकी घुणाक्षर न्यायाचा स्पष्ट उल्लेख आहे तर दुसरा काकतालीय न्यायच असला तरी त्याची उपपत्ती ज्ञानेश्वरांनी वेगळी दिलेली आढळते.

काकतालीय न्यायाची रूढ उपपत्ती किंवा अर्थ ज्ञानेश्वरांना माहीत नसावा, असं समजणं भाबडेपणाचं किंबहुना मूर्खपणाचं ठरेल. त्यामुळे ज्ञानेश्वरांनी हा वेगळा अर्थ लावण्यामागे त्यांचा निश्चितच काहीतरी हेतू असावा असं वाटतं.



अनुक्रमणिका

ज्ञानेश्वरांनी केलेली योजना अधिक अर्थपूर्ण आहे; कारण, लेखनाशी संबंधित अशी अक्षरनिर्मिती आणि टाळी वाजवणे ह्या दोन्ही क्रिया मानवी जीवनाशी वैशिष्ट्यपूर्णरीत्या निगडित आहेत. मानवप्राणीच फक्त लेखन करू शकतो. तसेच आनंद झाल्यावर टाळी वाजवणे ही गोष्ट जगभरातील सर्व मानव प्राण्यांत समान आढळते.

तसेच ताल म्हणजे हाताचा तळवा असाही अर्थ आहे. माणसाच्या ह्या तळव्यावर याच्या भाग्यरेषा असतात ही समजूतही जगात सर्वत्र आढळते. (येथे मर्ढेकरांच्या 'तळहाताच्या नाजूक रेषा कुणी वाचाव्या कुणी पुसाव्या' आणि आरती प्रभूंच्या 'याहून काय सांगू, हवा तर हात पुढे कर. वाचीन शब्दहीन रेषा डोळे मात्र बंद कर' ह्या ओळींची प्रकर्षाने आठवण होते.)

या ओवीत तामसदानासंबंधी जे दृष्टांत दिले आहेत तेही फक्त मानवी जीवनालाच लागू होतात. कावळा बसला आणि फांदी तुटली काय किंवा अख्खा ताड वृक्ष कोसळला काय, माणसाच्या जीवनात काय फरक पडतो? त्याचा मानवी जीवनाशी कोणताही संबंध येत नाही. उलट सहज म्हणून टाळी वाजवावी आणि त्यात कावळ्यासारखा चाणाक्ष पक्षी सापडावा ही मात्र माणसाच्या दृष्टीने क्वचित घडणारी म्हणूनच वैशिष्ट्यपूर्ण घटना ठरते. म्हणूनच काकतालीय न्यायाचा ज्ञानदेवांचा हा अर्थ अधिक सूचक वाटतो आणि त्यातूनच त्यांची अलौकिक प्रतिभाही दिसून येते.

आता कुणी 'टाळी वाजवायला आणि कावळा सापडायला एक गाठ पडली' असा शब्दप्रयोग केला तर त्याला हसायला नको.

**- उमेश करंबेळकर**

काकतालीयबद्दलचा महाभारततला आणि दुर्योधनाच्या तोंडचा एक श्लोक सांगतो. तो बाहेर पडला तेव्हा काही अशुभ घटना घडली. म्हणून तू जाऊ नकोस, असं त्याला कुणी तरी सांगितलं. तेव्हा त्यानं म्हटलं,

ग्रहाणां चरितं स्वप्नं निमित्तौत्पातिकं तथा ।
फलन्ति काकतालीयं तेभ्यः प्राज्ञा न बिभ्यति ।।

शेवटच्या रूपाबद्दल मला शंका आहे. खात्री करून घ्यायला जमलं नाही. सापडल्यावर कळवीन. सहज गंमत म्हणून लिहिलंय. अर्थ - ग्रहज्योतिष, स्वप्न, निमित्त (पाल पडणं, मांजर आडवं जाणं, डोळा लवणं इ०) उत्पात, काकतालीय न्यायानं घडतात. त्याला शहाणे घाबरत नाहीत.

**- मनोहर राईलकर**

'महाराष्ट्र-शब्दकोशा'त टाळ ह्या शब्दाचा अर्थ टहाळी असाही दिला आहे.

काकतालीय ह्या शब्दाच्या संदर्भात संस्कृत व्याकरणाच्या परंपरेतील कही ग्रंथांत झालेली चर्चा खालील दुव्यावर वाचता येईल. अर्थात ती संस्कृतात आहे.

http://avg-sanskrit.org/avgupload/dokuwiki/doku.php?id=sutras:5-3-106

अष्टाध्यायीतील ०५.०३.१०६ ह्या क्रमांकाच्या सूत्राच्या स्पष्टीकरणात उदाहरण म्हणून ही चर्चा येते. वासुदेवशास्त्री अभ्यंकर ह्यांनी केलेल्या महाभाष्याच्या अनुवादात (१९५२, भाग चवथा, पृ० ४७९) पुढील मजकूर आढळतो.

१ - (सू० १०६) इवार्थी केलेल्या समासाहून इवार्थी छ प्रत्यय होता. उदा० काकतालीयः देवदत्तस्य वधः। काकतालीय शब्दामध्ये काकताल ही समासवृत्ति होय आणि पुढे इवार्थी छ प्रत्यय होणे ही तद्धितवृत्ति होय. ह्या दोन्हीही वृत्ती निरनिराळ्या इवार्थी झाल्या आहेत. समासवृत्तीच्या जोरावर काक शब्दाचा अर्थ काकगमन आणि ताल शब्दाचा अर्थ तालपतन असा आहे. या गोष्टीचा जसा एकदम आकस्मिक योग झाला तसा एका विशेष ठिकाणी देवदत्त जायला आणि तेथे चोर यायला एकच गाठ पडली हा स्वार्थी समास होय. नंतर 'ताडाच्या आघाताने कावळा मृत झाला तसा चोराच्या आघाताने देवदत्त मृत झाला' हा इवार्थी तद्धित छ प्रत्यय झाला आहे.

ताल ह्याचा अर्थ सगळीकडे ताडाचे झाड असाच केलेला दिसतो. काकतालीयो देवदत्तस्य वधः हे मूळ उदाहरणवाक्य आहे. त्यात देवदत्ताच्या वधाचे काकतालीयाशी सादृश्य दाखवले आहे. कावळा एका ताडाच्या झाडाखाली गेला आणि ते झाड/फांदी/फळ अंगावर कोसळून मेला तसाच देवदत्त निर्जन रानात गेला आणि चोरांनी त्याला ठार मारले. उपरोक्त दुव्यावर दिलेल्या टीकांपैकी एकीत ताडाचे झाड पडून कावळा मेला असे म्हटले आहे (काकस्यागमनं यादृच्छिकम् तालस्य पतनं च। तेन (म्हणजे तालाने) तलेन पतता काकस्य वधःकृतः।) तर बालमनोरमेत ताडाचे फळ पडून (तालफलपतनात्) कावळा मेला असे म्हटले आहे. आपल्या दृष्टीने ह्यातून हाती लागणाऱ्या कामाच्या काही गोष्टी पुढीलप्रमाणे आहेत :

(१) काकतालीय ह्याचा अर्थ ( कावळा आणि ताड ह्यांच्यातील संबंधासारखा ) यादृच्छिक/योगायोगाचा असा होतो.

(२) त्यातील ताल म्हणजे ताडाचेच झाड. टाळी किंवा फांदी इ० नव्हे.

(३) ज्ञानदेवांनी वापरलेले पद फांदी ह्या अर्थाचेच असावे. टाळिये म्हणजे फांदीवरील कावळा सापडला असाच अर्थ त्यांना अभिप्रेत दिसतो. गीर्वाणलघुकोशकार ओकांनी कावळ्याला फांदीवर बसवले आहे. हा बदल ओकांनीच केला की परंपरेने आधीच तो होऊन त्यांच्यापर्यंत पोहोचला होता, हे गंमत म्हणून शोधता येईल.

**- सुशान्त देवळेकर**

नुकत्याच हाती आलेल्या एका पुस्तकातील संदर्भ या चर्चेच्या संदर्भात : काक म्हणजे कावळा. ताल म्हणजे ताडवृक्ष. तालीय म्हणजे ताडवृक्षाशी संबंधित. कावळ्याने सहज म्हणून ताडाच्या एखाद्या फांदीवर बसावे आणि ती फांदी तुटून पडावी ह्यालाच काकतालीय न्याय म्हणतात. म्हणजेच कावळा बसायला आणि फांदी तुटायला किंवा बोला-फुलाची गाठ पडणे किंवा क्वचित ताडाच्या झाडावर बसलेल्या कावळ्याच्या डोक्यावर ताडाचे फळ अचानक पडणे असाही या न्यायाच्या अर्थ होतो. (-बिदनूर जान्हवी. २०१२. लौकिक न्याय. पुणे : नितीन प्रकाशन)

**- चिन्मय धारुरकर**

मुद्दा चर्चेत आला ही गोष्ट चांगलीच झाली. काकतालीयन्याय ह्या शब्दातल्या 'ताल' किंवा 'ताली' ह्या शब्दाचा अर्थ लावतानाच काहीतरी गडबड झाल्यामुळे ह्या न्यायावर अन्याय झाला असं वाटतं. कारण ताल, ताली ह्या शब्दाचे जे निरनिराळे अर्थ कोशांत दिलेले आढळले त्यांत फांदी, डहाळी ह्या किंवा अशा अर्थाच्या शब्दांचा समावेश नाही. ताली ह्या संस्कृत शब्दाचा अर्थ ताडवृक्ष असा असताना टाळा (आंब्याचा टाळा म्हणजे डहाळी) असा लावून मराठीने घोटाळा केला असावा, अन् त्यातून 'कावळा बसायला अन फांदी तुटायला' असा वाक्प्रयोग रूढ झाला असावा असं वाटतं. ताडाच्या झाडावर कावळा बसायला अन् ते मोडायला एक गाठ पडली तर झाडाला कावळ्याचा भार सहन झाला नाही अशी कार्यकारणमीमांसा करू नये, ती केवळ योगायोगाची घटना समजावी हाच त्या न्यायाचा अर्थ होय. असं असलं तरी सद्गुरु मामा देशपांडे ह्यांनी 'टाळिये काउळा सापडे'मधल्या 'टाळिये'चा अर्थ टाळी नव्हे, तर टहाळी-फांदी असाच घ्यायला पाहिजे असं म्हटलं होतं (पाहा : 'श्री ज्ञानदेवांची शब्दकळा', शिरीष कवडे).

**- विजय पाध्ये**

संस्कृतमध्ये काकतालीय न्यायाच्या अर्थाचाच 'घुणाक्षर न्याय' आहे. घुण म्हणजे लाकूड कोरणारा किडा. ह्या किड्याने कोरलेल्या भागाला अक्षराकृती येणे हा घुणाक्षरन्याय (कारण असे योगायोगानेच घडते). ह्या ओवीत तामसदानाचे वर्णन आहे. तामस माणसाकडून तीर्थक्षेत्री पर्वकाळात दान घडणे ही केवळ योगायोगाची क्रिया. म्हणून घुणाक्षरन्याय आणि काकतालीयन्यायाचे दृष्टान्त दिले आहेत.

काकतालीय न्यायाचा ज्ञानेश्वरांनी लावलेला अर्थच योग्य वाटतो. त्याचं कारण अक्षरनिर्मिती - पर्यायाने लेखनक्रिया - आणि टाळी वाजवणे ह्या केवळ मनुष्यविशेष क्रिया आहेत. माणूसच केवळ लेखन करतो आणि टाळ्या वाजवतो. माकड किंवा चिंपांझी यांसारख्या माणसाप्रमाणेच अंगठा उरलेल्या चारही बोटांना लावू शकणाऱ्या प्राण्यांना तळहात नसलेल्या टाळ्या वाजवता येत नाहीत. हा तळवा माणसाचा विशेष आहे. ह्या





अनुक्रमणिका

तळहातावर सरस्वती राहते (कराग्रे वसते लक्ष्मी, करमध्ये सरस्वती) असं समजलं जातं. ह्याच तळहातावर माणसाच्या भाग्यरेषा असतात.

कावळा बसला आणि फांदी तुटली काय किंवा सबंध ताड वृक्ष कोसळला काय माणसाच्या दृष्टीने काहीच फरक पडणार नसतो. म्हणूनच काकतालीयन्यायाचा 'टाळी वाजवायला आणि कावळा सापडायला एक गाठ पडणे' असा अर्थ अधिक सयुक्तिक वाटतो.

**- उमेश करंबेळकर**

## मागोवा

### 'Working Lunch'च्या निमित्ताने-

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' वर्ष ३१ अंक १ (हिवाळा १३, पृ० ५१-५४)

ह्या टिपणात Working Lunchसाठी सुचवले गेलेले पर्याय प्रामुख्याने भोजनाची मात्रा दाखवणारे आहेत. त्यांना working चा संबंध नाही. वास्तविक working हा भोजनाची वर्गवारी (category) दाखवणारा शब्द आहे. आपल्याकडे वनभोजन, आवळीभोजन, इच्छाभोजन, सहस्रभोजन, लक्षभोजन, नमभोजन, राजकारण्यांचे प्रीतिभोजन, इफ्तार पार्टीनिमित्त आयोजित केलेले स्नेहभोजन, गेल्या शतकात समाजसुधारकांनी आयोजित केलेले चातुर्वर्ण्यांचे सहभोजन असे भोजनाचे अनेक प्रकार रूढ आहेत. तज्ज्ञांनी वरील प्रकारांसाठी इंग्लिश पर्याय अवश्य शोधावेत.

Working Lunchसाठी लघुभोजन हा पर्याय योग्य वाटत नाही. कारण 'महाभोजन' हे तेराव्याचे जेवण मानले जाते. त्यानुसार संस्कारांच्या दृष्टीने लघुभोजन हे बारशाचे जेवण मानावे लागेल.

प्रत्येक चर्चासत्रात किंवा कार्यशाळेत जेवण मोजकेच दिले जाते असे नाही. पुणे विद्यापीठातील कार्यक्रमांत ते श्रीखंडपुरीसह यथेच्छ दिले गेल्याचा अनुभव आहे. आयआयटी, अभियांत्रिकीसारख्या अन्य विद्याशाखांमध्ये अशा भोजनाची कंत्राटे तारांकित हॉटेलांनाही देण्यात येतात. निधी आणि उपलब्धता यानुसार जेवण मोजके की यथेच्छ ते ठरते. केवळ मिताहार डोळ्यासमोर ठेवून योजलेला लघुभोजन हा शब्द सर्वसमावेशक ठरणार नाही. Working Lunchमध्ये Working over Lunch हा अर्थ अभिप्रेत आहे. भोजनाच्या वेळीही कामकाजाची चर्चा चालते - ती चालावी अशी अपेक्षा असते. म्हणून अशा भोजनासाठी कामकाज भोजन (कामचलाऊ नव्हे) हा शब्द अन्वर्थक ठरावा. कामकाज भोजन हा शब्द Business Lunch साठीही चालावा. अर्थात या सर्व भोजनांच्या गर्दीत ठळकपणे उठून दिसणारा अस्सल मराठी शब्द म्हणजे गावजेवण!

Brunch

Brunch हे न्याहरीपेक्षा थोडे उशिरा आणि जेवणाच्या थोडे आधी घेतले जाते. पदार्थही बऱ्यापैकी पोटभरीचे ठेवण्यात येतात. याला 'निमजेवण' हा शब्द कसा वाटतो? निम उपसर्गाचा इथे योग्य वापर होतो. शिवाय न्याहरी (नाष्टा)मधला 'न' उच्चारदृष्ट्या येतो.

- **सुमन बेलवलकर**

स्थिरभाष : (020) 2523 4142

टीप : धारवाडचे डॉ० अ०रा० यार्दी ह्यांनी लघुसंदेशाद्वारे ई-शब्दचर्चा ह्या सदरातील लेखन आपल्याला आवडत असल्याचे नमूद करून, पुढे Working Lunchसाठी 'अल्पभोजन' हा शब्दप्रयोग आवडल्याचे आम्हांला कळवले आहे. औपचारिक प्रतिसाद म्हणून डॉ० यार्दी ह्यांचे आम्ही ह्या अभिप्रायाबद्दल आभार मानतो. तथापि, सर्व वाचकांसाठी असे आवाहन करावेसे वाटते की 'ई-शब्दचर्चा'पीठावरील चर्चेत जरी संगणकीय निरक्षरतेमुळे अथवा इतर कोणत्याही कारणास्तव ह्या चर्चेत थेट सहभागी होणे शक्य नसले तरी त्यांनी एखाद्या मुद्द्याबद्दल केवळ आवडनिवड नोंदविण्याऐवजी किंवा आपण सहमत असल्याचे किंवा नसल्याचे नमूद करण्याऐवजी चर्चेला वाव, प्रेरणा मिळेल अशा प्रकारे टिपणी करून अभिप्राय द्यावा. ई-टपालाने v.wordsmith@gmail.com ह्या ई-पत्त्यावर किंवा पारंपरिक टपालसेवेद्वारे संपादक, 'भाषा आणि जीवन'च्या पत्त्यावर असे अभिप्राय आले तर त्यांची दखल ई-शब्दचर्चापीठावर तसेच 'भाषा आणि जीवन'च्या अंकात घेतली जाईल. त्यामुळे त्या अभिप्रायावरही फेरप्रतिक्रिया नोंदवली जाऊ शकेल आणि हा उपक्रम अधिकाधिक उपयुक्त व रंगतदार होत जाईल.

**-संपादक**

### वर्गणीदारांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'ची वर्गणी ई-बँकिंग सुविधा वापरूनदेखील पाठविता येईल. इच्छुक वर्गणीदारांनी बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे येथील मराठी अभ्यास परिषदेच्या बचत खाते क्र० 20057164260 ह्या खात्यावर वर्गणीची रक्कम जमा करावी व व्यवहार पूर्ण केल्यानंतर परिषदेकडे पत्राद्वारे वा ई-टपालाने व्यवस्थापकांच्या पत्त्यावर शक्य तितक्या लवकर वर्गणीदाराचे संपूर्ण नाव, टपाल-पत्ता, स्थिरभाष क्रमांक, चलभाष क्रमांक, वर्गणी कोणत्या अंकापासून घेतली जावी त्याबाबत व भरणा केलेल्या रकमेचे तपशील कळवावेत.

# 'पालखी' : समन्वयशील जीवनदृष्टी

विजया चौधरी

[परीक्षित पुस्तक : 'पालखी' डॉ० सिसिलिया कार्व्हालो, २०१२, मैत्रेय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ११२, रु० १००/-]

डॉ० सिसिलिया कार्व्हालो यांनी संशोधन, संपादन, समीक्षा तसेच कविता, कथा, ललितगद्य अशा विविध साहित्यप्रकारांद्वारे आपल्या चिंतनाची अभिव्यक्ती केलेली आहे. ख्रिस्ती-हिंदू संस्कृतीच्या समन्वयातून तयार झालेली पक्की वैचारिक बैठक त्यांच्या लेखनाच्या मुळाशी असते. याच विचारधारेचे प्रत्यंतर त्यांचा 'पालखी' हा ललितलेखसंग्रह देतो. या संग्रहात एकूण पंचवीस स्फुट लेख समाविष्ट आहेत. त्यापैकी शेवटच्या लेखाचा अपवाद वगळता बाकी चोवीस लेखांना दै० महाराष्ट्र टाइम्सच्या 'सगुण-निर्गुण' या सदरामधून पूर्वप्रसिद्धी मिळालेली आहे. देव-धर्म-वय-शिक्षण याच्या पलीकडे जाऊन नैतिक मूल्ये, संस्कार व जीवनदृष्टीशी निगडित असलेले अध्यात्म लेखिकेला अभिप्रेत आहे आणि हेच या संग्रहातील लेखांमागचे समान सूत्र आहे. या सूत्राशी थोडासा फटकून असलेला 'सृष्टीचा चमत्कार' हा शेवटचा लेख मात्र, निसर्गातील विभ्रम व त्यामुळे जागणाऱ्या माणसाच्या संवेदना याविषयी आहे.

वसई या ख्रिस्ती-हिंदू संस्कृतींचा मिलाफ असलेल्या गावात गेलेले बालपण आणि दोन्ही धर्मांच्या संस्कारातून विस्तारलेली जीवनदृष्टी त्यांच्या लेखांमधून प्रतीत झालेली आहे. ख्रिस्ती व हिंदूंच्या जोडवस्तीत राहताना अनुभवलेला धर्मसमभाव, दोन्ही धर्मांतील सण-उत्सव साजरे करण्यामागील सौहार्द, सतत कानावर पडलेली ख्रिस्ती व मराठी संतांची गीते व सर्वांचा अमीट ठसा लेखिकेच्या मनावर कोरलेला आहे. अशा संस्कृतिसंगमाच्या वातावरणाचे हृद्यचित्रण 'सुरम्य संगम' या लेखात आहे. ''मराठी संतांच्या प्रपंचातून परमार्थ साधणाऱ्या नवोन्मेषशालिनी रचना आणि ख्रिस्ती संतांच्या सेवाकृत्यांची महानता यावर आमचा पिंड पोसला गेला आहे.'' (पृ० १७) असे लेखिका म्हणते तेव्हा ते वरवरचे नसते. सामाजिक-सांस्कृतिक एकीकरणामुळे गावातील समाजाचा लोप पावलेला धर्मभाव आणि दोन्ही धर्मांचे संचित घेऊन विकसित झालेले लेखिकेचे व्यक्तिमत्त्व या दोन्हींचा प्रत्यय जवळजवळ सर्वच लेखांतून येत राहतो. ''अध्यात्म हे धर्माशी बांधील नाही. जेथे माणसाच्या आत्म्याशी-मनाशी संवाद आहे तेथे अध्यात्म आहे.'' (पृ० १२) अशी जी अध्यात्माची व्याख्या लेखिकेने 'किमया' या लेखात

केली आहे, त्यामागचे मर्म हेच आहे.

लेखिका जन्माने ख्रिश्चन; परंतु संस्कारक्षम वयामध्ये लाभलेल्या उभयधर्मसमभावाच्या अनुभवातून प्रेरणा घेत लेखिकेने आपले व्यक्तिमत्त्व अधिक संपन्न व संस्कारित केले आहे. इंग्लिश व मराठी साहित्याचा अभ्यास, मराठी संत साहित्यातील विश्वात्मकता, धर्मग्रंथांचे साक्षेपी वाचन यामुळे या लेखनाला व्युत्पन्नता लाभलेली आहे. धर्मविचारांची साहित्यात पडलेली प्रतिबिंबे शोधण्याचा लेखिकेला नाद आहे. 'एकच ओघ आम्हातुनि वाहे' या लेखात त्याचा प्रत्यय येतो. आजच्या काळात मूलतत्त्ववाद, धर्मांधता, जातिभेद बोकाळत असताना एकात्मतेचा, आंतरधर्मीय सुसंवादाचा पुरस्कार करण्याची गरज असल्याचे सांगत लेखिकेने, 'वसुधैव कुटुंबकम्' या वेदकालीन संकल्पनेबरोबरच भगवान बुद्ध, वारकरी पंथातील संत यांच्याप्रमाणेच फादर थॉमस स्टीफन, शेख महंमद असे अन्य धर्मीय या सर्वांचे योगदान लक्षात आणून दिले आहे. हाच मानवतेचा धागा आपल्या लेखनातून पुढे नेणारे महात्मा फुले, केशवसुत, रेव्ह. टिळक यांचीही उद्धृते दिली आहेत. 'देवदूत' या लेखातही ख्रिश्चन धर्मातील 'राखणारा देवदूत' ही संकल्पना स्पष्ट करताना हाच देवदूत तुकोबांच्या अभंगात 'सांगाती' म्हणून, केशवसुतांच्या कवितेत 'तेजाची लेणी खोदणारा दूत' म्हणून तर, बालकवी, बोरकर, टागोर यांच्याही कवितांतून कसा भेटतो ते विषद केले आहे. अंतिमत:, हा देवदूत म्हणजे आपली सद्सद्विवेकबुद्धी, आपला आतला आवाजच आहे असे सांगत ख्रिश्चन धर्मातील 'राखणारा देवदूत' या संकल्पनेकडेही डोळसपणे पाहिले आहे. कोणत्याही धर्माकडे पाहण्याच्या याच डोळस वृत्तीचा प्रत्यय त्यांचे लेख वाचताना ठायी ठायी येत राहतो. 'पालखी' या लेखात 'उत्तम शुक्रवारी' गावातून निघणारी येशू ख्रिस्ताची पालखी व त्याच दरम्यान निघणारी हनुमान जयंतीची पालखी अशा दोन्ही पालख्यांच्या वेळची समाजाची सरमिसळ अनुभवताना आणि दोन्ही धर्मात असलेल्या 'पालखी' या संकल्पनेचा शोध घेताना लेखिकेला ख्रिस्ती धर्म भारतात रुजल्याचे ते प्रत्यंतर वाटले आहे. याच लेखात पुढे लेखिकेने शब्दांच्या पालखीत विसावलेले अर्थ किंवा केशवसुतांच्या कवितेतील शब्दपंक्तींनी वाहून नेलेला शारदेचा देव्हारा म्हणजे पालखीच; अशी पालखीची प्रतिमा विस्तारत नेलेली आहे. लेखाच्या शेवटी मात्र पृथ्वी ही सुद्धा 'विषुववृत्ताच्या खांद्यावर असलेली एक पालखीच' अशी केलेली कल्पना धर्माच्या पलीकडे जाणारी आहे.

लेखिकेचा मराठी-ख्रिस्ती साहित्याचा अभ्यास वादातीत आहे. भारतीय ख्रिस्ती साहित्यात आढळणारा पाश्चात्य, पौर्वात्य व भारतीय संस्कृतीचा संगम सिसिलियांच्या लेखनातही झालेला आहे. त्यांच्या लेखनात बौद्ध, मुस्लीम, हिंदू अशा इतर धर्मातील परंपरांचे, धर्मकल्पनांचे आणि वाङ्मयाचे सातत्याने येणारे संदर्भ त्यांच्या लेखनाला समृद्धी देणारे आहेत. बायबलच्या किंवा ख्रिस्ती धर्माच्या संस्कारामुळे लेखिकेची मराठी भाषा





अनुक्रमणिका

काहीवेळा वेगळ्या प्रतिमा घेऊन येते. त्या प्रतिमांमागचे सौंदर्य उलगडण्यासाठी वाचकही तितकाच व्युत्पन्न असावा लागतो. उदाहरणच द्यायचे तर 'लोलक' या लेखात, अमेरिकेतील दहशतवादी हल्ल्यात कोसळलेले जुळे मनोरे म्हणजे स्वातंत्र्यदेवतेच्या पुतळ्यासमोरील दोन मेणबत्त्या, असे जेव्हा लेखिका म्हणते तेव्हा त्या मनोऱ्यांचे भौगोलिक स्थान, ख्रिश्चन धर्मात असलेले मेणबत्त्यांचे महत्त्व वाचकाला माहीत असणे गरजेचे असते. इंग्लिश भाषेतून मराठीत भाषांतरित केलेले काही शब्द भाषेचा गोडवा वाढवणारे आहेत. सुरुवातीच्या मनोगतात त्या ख्रिस्ती धर्म भारतीय संस्कृतीत 'मुळावलेला' आहे असे म्हणतात, तेव्हा ते 'rooted in'चे शब्दशः भाषांतर असते. एका लेखाचे शीर्षक 'नितळकाच पाणी' असे आहे. ते वाचताना 'crystal clear' ही इंग्लिश संज्ञा आणि तिचे अर्थपूर्ण रूपांतर उचित वाटते. 'किनारे' या लेखात गालिलीच्या समुद्रातील वादळ येशूने आपल्या शब्दांच्या बळावर थोपवल्याचे सांगताना लेखिकेने 'होडीच्या वेदीवरून दिलेले प्रभावी प्रवचन' असे त्याचे वर्णन केले आहे. इथे 'होडीची वेदी' असे म्हणताना चर्चमधील 'alter' आणि 'Sermon' यांचा संदर्भ लेखिकेच्या मनात असतोच. असे अभिनव शब्दप्रयोग मराठी भाषेचे सौंदर्य तर वाढवतातच आणि येताना त्या त्या संस्कृतीतील नवे संदर्भ आपल्याबरोबर घेऊन येतात.

या संग्रहातील लेखन वृत्तपत्रीय मर्यादा सांभाळून केलेले आहे. थोडेसे प्रबोधनपरही आहे. अध्यात्म, विश्वबंधुत्व, धर्मविवेक याविषयी मुळातून विचार करायला लावणारे, गाभ्याकडे नेणारे आहे. ख्रिस्ती-मराठी साहित्याच्या तुलनात्मक अभ्यासासाठी अनेक विषय पुरवणारे आहे. तसा अभ्यास करण्याचे सामर्थ्य लेखिकेच्या लेखणीतही आहे. मात्र वृत्तपत्राचे माध्यम लेखिकेच्या प्रतिभेला पुरेसा अवकाश पुरवणारे नाही असे हे पुस्तक वाचताना वाटत राहते. ■

## लेखकांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'मध्ये प्रकाशित करण्यासाठी लेखन पाठवताना त्यासोबत इतर कोणत्याही ठिकाणी (नियतकालिक, जर्नल्स, स्मरणिका वगैरे) सदर लेखन प्रकाशित झालेले नाही, असे लेखकाने स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे. लेखनाचे टंकन संगणकाचा उपयोग करून केलेले असल्यास उत्तम, कोणतेही सॉफ्टवेअर वापरून टंकन केलेले असो, लेखन ई-टपालाद्वारे पाठवताना त्यासोबत टंकनकामात ज्या टंकांचा वापर केलेला असेल ते टंक व संपूर्ण लेखनाची एक पीडीएफ स्वरूपात तयार केलेली प्रत पाठवावी.

'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध करण्यासाठी लेखन पाठविल्यानंतर संपादकांची अनुमती घेतल्याखेरीज ते इतरत्र प्रकाशित करण्यासाठी देऊ नये.

दखलयोग्य

# महाराष्ट्रातील मराठीचे अध्ययन-अध्यापन : स्थिती व गती

**मनोहर जाधव**

सध्याच्या काळात माध्यमिक, उच्च माध्यामिक आणि महाविद्यालयीन पातळीवरील शिक्षकांचे स्थूलमानाने निरीक्षण केल्यास शिक्षक खरोखर प्रकृती पिंडाने शिक्षक आहेत काय असा प्रश्न अनेकांच्या बाबतीत निर्माण होतो. केवळ कागदोपत्री पात्रता असणारे अनेक लोक शिक्षणक्षेत्रात शिक्षकाची पदे बळकावून बसले आहेत, त्याचे हितसंबंध राखणारे आप्तस्वकीय आणि राजकीय कार्यकर्ते, नेते त्यांच्याभोवती आहेत. जे कार्यकर्ते या शिक्षकांचा राजकारणासाठी उपयोग करतात, यामध्ये काही गैर आहे असे शिक्षकांना वाटत नाही. सुरक्षित नोकरी म्हणून हे लोक शिक्षकाच्या नोकरीचा विचार करतात. जमिनीचा व्यवहार करणे, एजन्सी घेणे इ० तत्सम शिक्षणबाह्य कामात या शिक्षकांना रस असतो. जातीचा, प्रदेशाचा, पैशाचा वापर करून हे लोक सन्मानजनक पुरस्कार मिळवतात आणि समाजात दिमाखाने मिरवतात. याबाबत समाजालाही काही गैर वाटत नाही. यामुळे खऱ्या जाणकार शिक्षकाची कुचंबणा होते.

आज महाविद्यालयीन आणि विद्यापीठ पातळीवरचे मराठीचे अध्ययन-अध्यापन हे अतिशय भोंगळ झालेले आहे. अभ्यासातून विद्यार्थ्याला जीवनविषयक नवा दृष्टिकोन आणि विचार मिळायला हवा. मात्र तसे चित्र आज दिसत नाही. महाविद्यालयीन पातळीवरील अनेक शिक्षक वर्षानुवर्षे आपली टिपणे बदलत नाहीत. शिक्षक म्हणून ते स्वत:ला अद्ययावत करत नाहीत. विशेषत: ग्रामीण भागात हे चित्र मोठ्या प्रमाणात दिसून येते. परिणामत: ग्रामीण भागातून पदवी मिळवलेला विद्यार्थी हा तुलनेने मागे राहतो. गुणवत्ता आणि क्षमता असूनही या विद्यार्थ्याला अपेक्षित ध्येय गाठण्यासाठी खूप दमछाक करावी लागते. त्यात त्याचा उमेदीचा वेळ जातो.

मराठी विषयामध्ये एम०फिल० आणि पीएच०डी० पदवीसाठी संशोधन करावे असे बहुसंख्य विद्यार्थ्यांना वाटते. या विद्यार्थ्यांजवळ उत्साह मोठ्या प्रमाणात असतो, मात्र गांभीर्य आणि जबाबदारी याची जाणीव त्यातील कित्येकांना नसते. त्यामुळे तो ठेचकळत या पदव्यांचा अभ्यास सुरू करतो. या पदव्या मिळून त्या आधारे त्याला काही लाभ मिळावेत असे वाटते. त्यात गैर नाही. मुख्य म्हणजे या पदव्या मिळवल्यानंतरही विद्यार्थ्याची संशोधक म्हणून पुढे जडणघडण होतेच असे नाही. कित्येक विद्यार्थ्यांचे संशोधन या पदव्या मिळल्यानंतर थांबलेले दिसते. एम०फिल०,पीएच०डी० पदवी मिळवून

महाविद्यालयात प्राध्यापक होणाऱ्यांनी संशोधनदेखील केले पाहिजे, अशी अपेक्षा असते. मात्र या प्राध्यापकांचा संशोधक म्हणून पिंड घडत नाही असे दिसते. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या नव्या नियमावलीनुसार आता प्राध्यापकांना पदोन्नती मिळण्यासाठी संशोधनपर लेखन करावे लागणार आहे. नियम आले म्हणून आणि पदोन्नती मिळावी म्हणून संशोधन होईलही; पण ज्या संशोधनामागे निरपेक्ष प्रेरणा असतात आणि जे संशोधन आनंदासाठी आणि स्वत:बरोबरच समाजाच्या विकासासाठी केले जाते. त्या संशोधनाचा दर्जा अर्थातच वेगळा असतो. केवळ पदोन्नतीसाठी संशोधन करणे आणि संशोधनाचा ध्यास घेऊन काम करणे यामध्ये गुणात्मक फरक आहे. हा फरक लक्षात येणे गरजेचे आहे.

■

[ साभार : 'लोकमत', २४ फेब्रुवारी २०१३ ]

## श्रद्धांजली

१ 'किर्लोस्कर', 'स्त्री' आणि 'मनोहर' या मासिकांचे संस्थापक - संपादक मुकुंदराव किर्लोस्कर यांचे १० मार्च २०१३ रोजी दु:खद निधन झाले. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीत त्यांचा मोठा वाटा आहे. मराठी अभ्यास परिषदेचे ते आजीव सदस्य होते. मराठी अभ्यास परिषद त्यांच्या निधनाबद्दल शोक व्यक्त करीत आहे.

२ ज्येष्ठ समीक्षक आणि तौलनिक साहित्य अभ्यासक डॉ० चंद्रशेखर जहागीदार यांचे १ एप्रिल २०१३ रोजी दु:खद निधन झाले. त्यांना परिषदेतर्फे श्रद्धांजली.

३ डॉ० आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातील निवृत्त प्राध्यापक, मराठी व इंग्रजी साहित्याचे व्यासंगी अभ्यासक व समीक्षक डॉ० रवींद्र किंबहुने यांचे नुकतेच दु:खद निधन झाले. परिषद त्यांच्या निधनाबद्दल शोक व्यक्त करीत आहे.

४ संतसाहित्याचे अभ्यासक, पुणे विद्यापीठाच्या ज्ञानदेव अध्यासनाचे माजी प्रमुख डॉ० वि०रा० करंदीकर यांचे १५ एप्रिल २०१३ला दु:खद निधन झाले. त्यांच्या मराठी संत साहित्य व ज्ञानकोशविषयक कार्याची आठवण सर्वांनाच राहील. त्यांना परिषदतर्फे श्रद्धांजली.

# शालेय शिक्षणाचे माध्यम सेमी-इंग्लिश?

जयश्री काटीकर

मराठी अभ्यास परिषदेद्वारे 'शालेय शिक्षणासाठी सेमी-इंग्लिश माध्यम असावे का?' या विषयावर १६ डिसेंबर २०१२ रोजी दिवसभराचे चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. पेरूगेट भावेस्कूलमधे झालेल्या या चर्चासत्राच्या पहिल्या भागाचे अध्यक्ष होते प्रा० प्र० ना० परांजपे तर दुसऱ्या भागाचे अध्यक्ष होते रमेश पानसे. दिवसभरात एकूण १२ निबंधांचे वाचन झाले.

पहिल्या सत्राचे प्रास्ताविक विजय पाध्ये (सहकार्यवाह, मराठी अभ्यास परिषद) यांनी केले. 'दै० लोकसत्ते'त (१० ऑगस्ट १२) डॉ० वसंत काळपांडे यांचा 'सेमी इंग्लिश : एक सुवर्णमध्य' असा लेख प्रकाशित झाला होता. त्या लेखावर 'सेमी इंग्लिश : सुवर्णमध्य की सुवर्णमृग' ह्या शीर्षकाखाली डॉ० वीणा सानेकर यांची प्रतिक्रिया (१७ ऑगस्ट १२, दै० लोकसत्ता) प्रसिद्ध झाली. आणि या अत्यंत महत्त्वाच्या विषयाच्या चर्चेला तोंड फुटले. या विषयाचे महत्त्व ओळखून विविध स्तरांवर काम करणाऱ्यांनी एकत्र येऊन यावर चर्चा करावी, त्याचा सांगोपांग विचार करावा असा हेतू मनात ठेवून मराठी अभ्यास परिषदेने हे चर्चासत्र आयोजित केले असे पाध्ये यांनी सांगितले.

सुरुवातीला प्रा० परांजपे यांनी शिक्षणाची उद्दिष्टे काय आहेत ते सांगून भाषा म्हणून भाषा शिकणं आणि माध्यम म्हणून तिचा वापर करणं या गोष्टींतली तफावत मांडली. भारतात एकाच राज्यात इतर भाषा बोलणारेही अनेक जण आहेत. 'मातृभाषेतून' शिक्षण म्हणताच मराठीची सक्ती रद्दबातल ठरते. मराठीतही प्रमाण आणि बोली हा फरक आहेच. भाषिक धोरणं नक्की करताना राजकीय, सामाजिक, शैक्षणिक विचार/मन, भाषाभिमान असे अनेक मुद्दे असतात. त्याचप्रमाणे पुरेशी सांख्यिकी माहिती आपल्याकडे उपलब्ध असते का? महाराष्ट्रात किती माध्यमाच्या किती शाळा, त्यात शिक्षण घेणारी विद्यार्थी संख्या इत्यादी सर्व मुद्दे विचारार्थ प्रा० परांजपे यांनी समोर ठेवले.

डॉ० प्रा० काळपांडे यांच्या लेखातील (निबंधातील) काही ठळक मुद्दे प्रा० आनन्द काटीकर यांनी वाचून दाखवले. ते असे : महाराष्ट्रात 'सेमी इंग्लिश' पद्धतीनुसार गणित-विज्ञान विषय इंग्रजीतून शिकवले जातात. सुरुवातीला आठवीपासून नंतर पाचवीपासून तर आता पहिलीपासून 'सेमी इंग्लिश' करण्याकडे शाळांचा कल वाढतो आहे. 'सेमी

इंग्लिश' पद्धतीत शिक्षणाचे मूळ माध्यम मराठीच राहात असल्याने मराठी माध्यमाला ही पद्धत मारक नाही तर पूरक आहे. विद्यार्थ्यांची बहुभाषिकत्वाकडे वाटचाल होण्यासाठी फायदेशीर आहे. इंग्रजी माध्यमांकडे जाणारा ओढा कमी करण्यासाठी, स्वभाषेची अस्मिता आणि व्यवहार ज्ञानासाठी इंग्लिशची उपयोगिता या दोन्हींसाठी 'सेमी इंग्लिश' हा सुवर्णमध्य आहे. ती जणू मूकक्रांतीच आहे.

डॉ० सानेकर 'सेमी इंग्लिश'-सुवर्णमध्य की सुवर्णमृग' या आपल्या 'दै० लोकसत्ता'मधील लेखातून प्रत्युत्तर दिले होते. त्यांच्या निबंधातील ठळक मुद्दे प्रा० काटीकर यांनी वाचून दाखवले. ते असे : 'सेमी इंग्लिश' संदर्भात प्रा० सानेकर यांनी काही प्रश्न उपस्थित केले आहेत : (१) इंग्रजी ज्ञानाची दालने खुली होण्यासाठी 'सेमी' हा एकमेव पर्याय आहे का? (२) 'सेमी'साठी विज्ञान आणि गणित याच विषयांची निवड का? (३) 'सेमी इंग्लिश हा पर्याय असावा की ती सक्ती असावी? (४) स्वत:चे अस्तित्व टिकवण्यासाठी मराठी शाळा सेमीकडे वळलेल्या दिसतात. हे विद्यार्थ्यांच्या खरोखरच हिताचे आहे का, इकडेही लक्ष देणे गरजेचे आहे. 'मराठी शाळांत इंग्रजीचे सक्षमीकरण' या मुळातल्या अत्यंत महत्त्वाच्या मुद्द्याकडे त्या आपल्या सर्वांचे लक्ष वेधतात.

गीता दुवेदी यांनी मुलांवर इंग्रजी माध्यमामुळे पडणारा अतिरिक्त ताण आणि निव्वळ पाठांतराचे प्रमाण वाढत जाईल या मुद्द्यांकडे लक्ष वेधले. शिवाय सध्याच्या शाळांमधून शिकवणाऱ्या शिक्षकांची शैक्षणिक पात्रता, इंग्रजीतून विषय शिकण्याची त्यांची पात्रता या महत्त्वाच्या मुद्द्याकडेही त्यांनी उपस्थितांचे लक्ष वेधले.

डॉ० शीला कोलटकर यांच्या मते शिक्षणाची प्रक्रियाही कळलेलं मांडणं एवढ्यापुरतीच मर्यादित असणं अपेक्षित नाही, तर त्यातून नवनिर्मिती घडली पाहिजे. कळलेली माहिती व ज्ञान स्वत:च्या शब्दात मांडता येणं हे महत्त्वाचं असून त्यासाठी मातृभाषेतून शिक्षण हा उत्तम पर्याय आहे.

डॉ० व०सी० देशपांडे यांच्या मते माध्यमाचा प्रश्न केवळ भाषिक नाही तर त्याला राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक असेही पैलू आहेत. मातृभाषेतून शिक्षण घेताना मुलाची २००० शब्दांची पूर्वतयारी असते. तशी इतर माध्यमांची नसते. त्यामुळे त्यांच्या मते मातृभाषेतून शिक्षण हाच उत्तम पर्याय आहे. (यांचा निबंध अंकात समाविष्ट आहे.)

श्री०द० महाजन यांच्या मते प्राथमिक शिक्षण अध्ययन (पहिली ते आठवी) मातृभाषेतून आणि नंतर नववी-१०वी, ११वी-१२वी सेमी माध्यमातून द्यावे. 'Next to defence' इतके महत्त्व शिक्षणाला हवे; पण ते तसे घडत नाही. यातून वैचारिक-शैक्षणिक गुलामगिरीच एका अर्थाने जाणवते आहे.

सेमी इंग्रजी माध्यमात कुठले विषय इंग्रजी आणि कुठल्याहमराठीतून याचा पर्याय

नसतो. गणित-विज्ञान महत्त्वाचे (कशाच्या आधारावर?) आणि बाकीचे बिन (किंवा कमी) महत्त्वाचे हे वर्गीकरणच मुळात बरोबर आहे का? असा प्रश्न प्रा० मनोहर राईलकर यांनी उपस्थित केला. कुठलीही परकीय भाषा शिकायला, ती समजायला-लिहायला सहा महिन्यांचा कालावधी पुरेसा असतो. खरी आवश्यकता आहे ती इंग्रजीबद्दलचा न्यूनगंड झुगारून देण्याची, यावर त्यांनी भर दिला. १९९४च्या सर्वोच्च न्यायालयाच्या एका निर्णयानुसार अपरिचित भाषेत शिक्षणाचा क्रूर ताण मुलांना सहन करावा लागतो, असेही त्यांनी आपल्या निबंधात सांगितले.

अक्षरनंदन शाळेत जे भाषिक वेगवेगळे प्रयोग चालतात त्याची माहिती विद्या पटवर्धन यांच्या निबंधाद्वारे झाली. त्यांच्या निबंधातील ठळक मुद्द्यांचे वाचन प्रा० परांजपे यांनी केले. डॉ० अशोक केळकर यांच्या मते 'सहा-सात वर्षांपर्यंत कितीही भाषा कानावर पडल्या तर मूल भाषिक व्यवहार (बोलणे) करू शकतं. मात्र ज्या टप्प्यावर मूल वाचन-लेखन कौशल्य शिकतं तेव्हा त्याला एकच भाषा शिकवणं उचित ठरतं.' यानुसार अक्षरनंदन शाळेत बालवाडीपासूनच गाणी-गोष्टी, खेळ, कृती इ० माध्यमांतून मराठीबरोबरच इंग्रजी आणि हिंदी भाषांची ओळख होते. शक्यतो त्याच भाषांतून ताई मुलांशी संवाद साधायचा प्रयत्न करतात. भाषेबरोबर त्या त्या साहित्याचा परिचय; जेणेकरून ती संस्कृतीही मुलांना कळेल, मुलांना करून देणं महत्त्वाचं असतं. एखाद्या भाषेमध्ये रुजणं जेवढं महत्त्वाचं आहे तेवढंच रुतलेलं नसणं महत्त्वाचं आहे असं त्यांनी सांगितलं. आजच्या काळातलं इंग्रजीचं महत्त्व दृष्टिआड करून चालणार नाही. त्यामुळे त्या भाषेचं शिक्षण अनिवार्य आहेच. पण कोणत्या वृत्तीतून आपण इंग्रजी शिकतो ते महत्त्वाचं आहे.

अनिल गोरे यांनी काही वेगळ्या बाबींकडे उपस्थितांचे लक्ष वेधले. 'मातृभाषेतून शिक्षण' यावर भर देत सेमी इंग्रजी हा एक घातक भ्रम' असल्याचे मत त्यांनी मांडले.

त्यांच्यामते मराठीतून संज्ञा समजण्यास सोप्या असतात. (उदा० सपुष्प, अपुष्प). सातवीत उत्तम गुण मिळवणाऱ्या विद्यार्थ्याला सेमी इंग्रजीचाच पर्याय उपलब्ध असतो. हा पर्याय घातक आहे. विद्यार्थ्यांच्या विचार करण्याची अथवा अभिव्यक्ती क्षमता या सर्वांवरच विपरीत परिणाम होतो. आणि म्हणून सेमी इंग्रजी पर्यायाला ते वि-परीस (परीसच्या विरुद्ध अर्थी) संबोधतात.

रमेश पानसे यांच्या मते शैक्षणिक धोरणात्मक निर्णय शासन घेत असते. पण 'ज्ञान' ही शासनबाह्य गोष्ट आहे. त्यामुळे यात पूल बांधणे आवश्यक आहे.

बरेच वेळेला शासन निर्णय घेते. मग आपण त्यावर चर्चा करतो. पण एखादा निर्णय होण्यापूर्वीच त्यावर विचारविनिमय करून शासनावर आवश्यक ते दडपण आपण आणू शकतो का? धोरण ठरवण्यापूर्वी सारासार विवेक महत्त्वाचा. त्यासाठी 'प्रभाव गट'

निर्माण केले पाहिजेत अशीही मांडणी त्यांनी आपल्या भाषणातून केली.

भाषेच्या माध्यमाचा आपल्यासमोरचा प्रश्न काय? त्याचे परिणाम काय? आपण त्यावर उपाययोजना कशाप्रकारे करतो आहोत? याकडे गंभीरपणे पाहण्याची निकड डॉ० सुमन करंदीकर यांनी या वेळी मांडली. (त्यांचा निबंध अंकात समाविष्ट)

प्रा० परांजपे यांनी अध्यक्षीय समारोप करताना इंग्रजी शिक्षण खाजगी पद्धतीने देता येईल का? असाही प्रश्न त्यांनी उपस्थित केला. 'इंग्रजीवर स्वार व्हावं; त्याचा दास होऊ नये,' अशी भूमिका मांडली.

पुढच्या सत्रात सुरुवातीलाच दोन महाविद्यालयीन विद्यार्थिनींनी आपले अनुभव उत्स्फूर्तपणे मांडले. मेघा नित्सुरे ही सेमी इंग्रजी माध्यमातून शिकलेली व महाविद्यालयात कॉमर्स शिक्षण घेणारी विद्यार्थिनी आहे. तिच्या मते इंग्रजी माध्यमातून गणित-विज्ञान विषय शिकणे सुरुवातीला जड गेले. पण नंतर सरावाने नववी-दहावीत सोपे गेले. मराठी माध्यमापेक्षा सेमी इंग्रजीसाठीची इंग्रजी पाठ्यपुस्तके वेगळी असावीत अशीही मागणी तिथे नोंदवली. सेमी इंग्रजी पद्धतीने शिक्षण घेण्याचा पर्याय निवडीचे स्वातंत्र्य तिला नव्हते, तर दोन तुकड्यांसाठी ते बंधनकारकच होते असेही तिने सांगितले.

स्नेहल वावळ ही मराठी माध्यमात शिकलेली विद्यार्थिनी. तिला आकाशवाणीवर सूत्रसंचालक व्हायचे किंवा स्पर्धापरीक्षांमध्ये यश मिळवायचे असल्याने तिने मराठी माध्यमाची निवड केली. पण त्यामुळे कायम दुय्यम स्थान, हिणकस वागणूक मिळत राहिली. मात्र मराठी माध्यमामुळे अभ्यासाचा अतिरिक्त ताण नसल्यामुळे स्नेहसंमेलनांत, बाहेरच्या वक्तृत्व स्पर्धांमध्ये ती उत्स्फूर्त भाग घेऊ शकली.

विदुला शेंडे (शिक्षिका, पालक) यांनी आपल्या पाल्यांची आकलनशक्ती पालकांना कळली पाहिजे. 'फाड् फाड् इंग्रजी बोलता येणे' यातच समाधान मानणे हे गैर. त्या इंग्रजीतही भरपूर चुका असतात; त्या पालकांना कळत नाहीत. मग इंग्रजीतून शिकवण्याचा अट्टाहास का? यासाठी मोठ्या प्रमाणावर पालकांनाच समुदेशन करणं आवश्यक आहे, असे मत मांडलं.

रमेश पानसे ह्यांनी समारोप करताना म्हटले की, एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात जाताना सुरुवातीच्या अडचणी जाणवतात. या अडचणी पहिली, पाचवी, आठवी की ११वी - कोणत्या वेळेला आलेल्या चालतील असा प्रश्न उपस्थित केला. त्यांच्या मते मराठी शाळांमधून इंग्रजी शिकताना अध्ययनापेक्षा अध्यापनाच्या अडचणीच जास्त आहेत. तसेच मराठी शाळा शिकवण्यासाठी सेमी पद्धतीची पळवाट त्यामुळे मराठी शाळा टिकतील; पण मुलांच्या शिक्षणाचं काय?

जोपर्यंत उच्च शिक्षण मराठी माध्यमात होत नाही, तोपर्यंत ही चर्चा करणं उपयोगाचं नाही, असं मत सुशांत देवळेकर यांनी मांडलं. marathibhasha.com या

संकेतस्थळाची माहिती संजय भगत यांनी दिली. लाखांवर पारिभाषिक शब्द विनावापर पडून होते ते त्यांनी या संकेतस्थळावर सगळ्यांसाठी उपलब्ध करून दिले आहेत. लोकांपर्यंत 'मराठी' पोचवणं ही तुमची आमचीच जबाबदारी आहे असं सांगून यासाठी शिखर संघटना उभारावी अशी अपेक्षा व्यक्त केली.

या चर्चासत्रात अशोक तकते, विश्वास देशमुख, म०ना० गोगटे, बळवंत रिसबूड, शांताराम दातार, रामदास वाव्हळ आदींनीही आपली मते मांडली.

■

## तत्क्षणी भाषांतरे

सुरुवातीला 'रन-टाइम ट्रान्सलेशन' म्हणजेच तत्क्षणी परिपूर्ण नसतील, पण हळूहळू होत जातील; आणि त्यामुळेच तर परस्परांच्या भाषा अवगत नसूनही हे लोक जागतिक व्यवहारात सहजतेनं पुढे जातील. कारण त्यासाठी तयार होत असलेलं सॉफ्टवेअर 'सेल्फ इम्प्रुव्हिंग व सेल्फ करेक्टिंग' (स्वतःच स्वतःमध्ये आपोआप सुधारणा करणारं व चुकांची दुरुस्ती करणारं) असणार आहे, नॅनो टेक्नॉलॉजीमुळे ते अतिशय वेगवान अशा संगणकांवर व मोबाईल फोन्सवर चालेल व रिअल टाइम इफेक्ट आपल्याला बोली भाषांतराच्या स्वरूपात मिळेल.

सेल्फ इम्प्रूव्हिंग आणि सेल्फ करेक्टिंग सॉफ्टवेअरच्या निर्मितीची पहाट झालेली आहे. आता त्याच्या छोट्या-छोट्या पाऊलखुणा आपल्याला दिसताहेत. डोकोमो कंपनीने आपल्या जपानी ग्राहकांना मोबाईलवरील संभाषणात जपानीतून इंग्रजीत व इंग्रजीतून जपानीत भाषांतर सेवेची प्रायोगिक पातळीवर सुरुवात केली आहे व त्याचे निष्कर्ष उत्साहवर्धक आहेत.

विवेक सावंत, महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, जानेवारी-मार्च २०१३

# मराठी भाषासप्ताहानिमित्त

जयश्री काटीकर

मराठी भाषा सप्ताहानिमित्त 'मराठीची स्वाभिमानशून्य पाठ्यपुस्तके (इंग्रजी माध्यमातील मराठीची दयनीय स्थिती)' या विषयावर प्रा० सुप्रिया खाडिलकर यांचे व्याख्यान मराठी अभ्यास परिषद आणि गरवारे वाणिज्य महाविद्यालय यांच्या संयुक्त विद्यमाने दि० २५ फेब्रुवारी २०१३ला आयोजित करण्यात आले होते. कार्यक्रमाला डॉ० केतकी मोडक (मराठी विभाग प्रमुख, गरवारे वाणिज्य महाविद्यालय) यांची विशेष उपस्थिती लाभली. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान डॉ० नीलिमा गुंडी यांनी भूषविले.

कनिष्ठ महाविद्यालयात मराठीचे अध्यापन करत असताना विशेषत: इंग्रजी माध्यमातून आलेल्या मुलांची लिखाणाबाबत असलेली गंभीर परिस्थिती प्रा० खाडिलकर यांच्या लक्षात आली. इंग्रजी माध्यमातील शाळांच्या मराठी पाठ्यपुस्तकांचा त्यांनी खोलात जाऊन अभ्यास केला. माहिती अधिकाराचा वापर करूनही त्यांनी काही माहिती मिळवली. शासन, पाठ्यपुस्तक मंडळ, संस्थाचालक, शिक्षक या व्यवस्थेच्या चुकीची शिक्षा मुलांना भोगायला लागते आहे अशी खंत त्यांनी व्याख्यानातून व्यक्त केली.

आज मराठी घरांतून ८०% मुलं इंग्रजी माध्यमाच्या शाळांत शिकत आहेत. याचाही विचार पाठ्यपुस्तकं तयार करताना होणे अपेक्षित आहे. लेखन आणि वाचन या कौशल्यांवर पहिली-दुसरीचा भर द्यायला हवा; कारण त्याशिवाय आठवी व नववीच्या अभ्यासक्रमातील जाहिरातलेखन, कथालेखन या गोष्टी त्यांना खूप जड जातात. सुरुवातीला मराठीची काठिण्यपातळी खूपच कमी - बाळबोध स्वरूपाची तर नंतर काठिण्यपातळी वरच्या स्तरावर या मुद्द्याकडेही त्यांनी लक्ष वेधले. इंग्रजी माध्यमात मराठी शिकवण्यासाठी अर्हताप्राप्त शिक्षकाची गरज नाही, तर मराठी माध्यमात इंग्रजी शिकवण्यासाठी इंग्रजीमधून डीएड झालेल्या व्यक्तीची गरज आहे. इंग्रजी माध्यमात मराठीसाठी आठवड्यातून केवळ दोन तासिका तर मराठी माध्यमात इंग्रजी शिकवण्यासाठी आठवड्यातून पाच तासिका ठेवण्यात आलेल्या आहेत. या तौलनिक निरीक्षणातून त्यांनी श्रोत्यांना विचारप्रवृत्त केले.

इंग्रजी माध्यमातील मराठी पाठ्यपुस्तके हा पुरेसा गोंधळाचा आणि गोंधळलेला विषय आहे. काठिण्यपातळी मधेच वाढते, कधी कमी होते. त्यात एकसूत्रीपणा, एकात्मिक विचार नाही. (उदा० चौथीच्या पुस्तकात अनुलेखन/श्रुतलेखन यावर भर असताना

पाचवीच्या पुस्तकात 'आई घर बघ' हा तीन वाक्यांचा धडा आणि पहिली ३० पानं बाराखडीसाठी. मुलांचा वयोगट आणि पाठ्यपुस्तकांमधील आशय यांचाही पुरेसा विचार झालेला दिसत नाही. १०-१२ वर्षांच्या मुलांसाठी अगदीच बाळबोध स्वरूप धडे आहेत. त्यामुळे मराठी एकदम 'सोप्पी', दुर्लक्षित राहते. अनुवादित साहित्याचे प्रमाणही जास्त. सकस, दर्जेदार मराठी मुलांपर्यंत पोचतच नाही. जी गोष्ट आशयाची तीच त्या खालील स्वाध्यायांचीही. जोड्या लावा, गाळलेल्या जागा भरा अशा स्वरूपाच्या स्वाध्यायांमुळे 'लेखन' कौशल्य वाढीस लागत नाही.

केवळ पास होणं एवढ्यापुरतीच 'भाषा' मर्यादित राहू नये, तर सकस भाषा शिकायला मिळावी, हा उद्देश पाठ्यपुस्तकांचा असावा. अशा 'मार्क्सवादी' भूमिकेमुळे ९वी, १०वीत 'बेस्ट ऑफ फाइव्ह'मुळे मराठीला 'रामराम' मिळतो. पण परत ११वी, १२वीत जेव्हा या ना त्या कारणाने ती घ्यावी लागते, तेव्हा विद्यार्थ्यांची ससेहोलपट होते. हे सर्व थांबवण्यासाठी सगळ्यांनी मिळून प्रयत्न करण्याची, मदत करण्याची, लढा देण्याची गरज आहे, असे मत प्रा० खाडिलकर यांनी आपल्या व्याख्यानातून व्यक्त केले.

नंतर झालेल्या चर्चेदरम्यान अनेक मते व्यक्त झाली. पाठ्यपुस्तकांचे परीक्षण व्हावे, पाठ्यपुस्तक मंडळ कुणाला बांधील आहे हे कळायला पाहिजे, शासन-पाठ्यपुस्तक मंडळ यांनी दबाव निर्माण करण्यासाठी शिक्षक-पालक-जागरूक नागरिक यांची संघटना निर्माण करणे, 'लिहावे नेटके', 'वाचू आनंदे' यांसारखे काही पर्याय (पाठ्यपुस्तकांना) शोधणे यांवर चर्चा झाली. व्याख्यानाला 'बालभारती'तलेही काही पदाधिकारी उपस्थित होते; पण उपस्थित श्रोत्यांना समाधानकारक उत्तर कुणीही देऊ शकले नाही.

डॉ० केतकी मोडक यांनी आपल्या भाषणात मराठी माध्यमांच्या मुलांना लेखन-कौशल्याचे काही अनुभव सांगून मराठी माध्यमातील मुलांची लेखनविषय समज चिंताजनक असल्याचे नमूद केले. आपापल्या क्षेत्रात थोर असणाऱ्या सर्व मराठीप्रेमी मंडळींनी एकत्र येण्याची आवश्यकता त्यांनी अधोरेखित केली. 'मराठीला ऊर्जितावस्था' प्राप्त करून देणे हेच सगळ्यांचे ध्येय असले तरी त्याचा सामूहिक परिणाम साध्य करता यायला हवा असे त्यांनी सांगितले.

आपल्या अध्यक्षीय समारोपात डॉ० नीलिमा गुंडी यांनी 'स्वाभिमान' या शब्दाकडे उपस्थितांचे लक्ष वेधून भाषा ही सांस्कृतिक वारशाची जपणूक करणारी असली पाहिजे, केवळ माहितीची ओझी वाहण्यासाठी भाषेचा वापर होता कामा नये, अशी ठाम भूमिका घेतली. मुलांच्या या घडणीच्या वयात - ०८ ते १२ वर्षे - त्या त्या भावजीवनाचे अस्तर तयार करण्याचे काम भाषा करत असते. त्यामुळे भाषेतून आपल्या परंपरेशी नातं जुळणं, स्वत्वाची ओळख होणं घडत असतं. आपला सांस्कृतिक कणा जोपासण्यासाठी

हे संस्कार व्हायलाच हवेत. असे त्यांनी सांगितले. विजय पाध्ये यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले आणि प्रा० आनन्द काटीकर यांनी आभार मानले. या कार्यक्रमाला श्रोत्यांचा प्रतिसाद चांगला मिळाला. ■



# युनिकोड कार्यशाळा : १

आनन्द काटीकर

सोमवार दि० २८ जानेवारी, २०१३ रोजी, नागपूर येथील वसंतराव नाईक शासकीय समाजविज्ञान संस्था आणि मराठी अभ्यास परिषद यांनी संयुक्तपणे युनिकोड कार्यशाळेचे आयोजन केले होते. याप्रसंगी संयोजक प्रा० डॉ० नंदकुमार मोरे यांनी प्रास्ताविक केले. संस्थेतील प्रा० अविनाश तलमले यांनी संगणकावर वर्ड आणि एक्सेल कसे वापरायचे याचे मार्गदर्शन केले तर मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह प्रा० आनन्द काटीकर यांनी संगणकावर युनिकोड कसे वापरावे याचे मार्गदर्शन केले. संस्थेच्या सुंदर सभागृहात ही कार्यशाळा झाली. या कार्यशाळेत ८८ जणांनी आपला सहभाग नोंदवला. सर्व उपस्थितांना सी-डॅक, पुणे यांच्या वतीने तयार केलेली युनिकोड साहाय्यता चकती वितरित करण्यात आली. ■

# युनिकोड कार्यशाळा : २

मराठी दिनाच्या निमित्ताने, शनिवार, दि० २ मार्च, २०१३ रोजी, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे, मराठी अभ्यास परिषद आणि सी-डॅक यांनी संयुक्तपणे युनिकोड कार्यशाळेचे आयोजन केले होते. याप्रसंगी कार्यशाळेचे संयोजक प्रा० आनन्द काटीकर यांनी प्रास्ताविक केले. मराठी अभ्यास परिषदेने दरवर्षी किमान ५००जण मराठीत संगणक वापरू लागतील असे ध्येय ठरवले असल्याचे त्यांनी सांगितले. सी-डॅकमधील वरिष्ठ तांत्रिक अधिकारी श्रद्धा काळेले आणि चंद्रकांत धुतडमल यांनी उपस्थितांना मार्गदर्शन केले. फर्ग्युसन महाविद्यालयाच्या दृक्श्राव्य सभागृहात ही कार्यशाळा झाली. सादरीकरणानंतर सर्व सहभागींनी भाषा प्रयोगशाळेत प्रत्यक्ष संगणकावर मराठीत काम कसे करता येते, याचा अनुभव घेतला. या कार्यशाळेत ७८ जणांनी आपला सहभाग नोंदवला. सर्व उपस्थितांना सी-डॅक, पुणे यांच्या वतीने तयार केलेली युनिकोड साहाय्यता चकती वितरित करण्यात आली. ■

# महाबँक पुरस्कार समारंभ

आनन्द काटीकर

आज जग जवळ आल्याचा परिणाम आपल्या प्रमाणभाषेवर होऊ लागला आहे, तसाच बोलींवरही होऊ लागला आहे. बोलींमध्ये असणारी ऊर्जा, तेज आणि जोर हरपत चालला आहे. परिणामी बोलींमधील अनेक अर्थवाही शब्द अस्तंगत होत आहेत. अशा परिस्थितीत डॉ० कैलास सार्वेकर यांनी बोलींवर लिहिलेल्या या पुस्तकाचे मोल असाधारण आहे. त्यांच्या या उपयुक्त ग्रंथाबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो, असे प्रतिपादन महामहोपाध्याय डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांनी केले. मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने कैलास सार्वेकर यांना 'बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती' या पुस्तकासाठी महाबँक पुरस्काराचे वितरण करताना ते बोलत होते.

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने, दरवर्षी मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनासाठी महाराष्ट्र बँकेच्या सहयोगाने महाबँक पुरस्कार देण्यात येतो. रु० ५,०००/- आणि सन्मानपत्र असे या पुरस्काराचे स्वरूप असते. वर्ष २०१० आणि २०११मध्ये प्रसिद्ध झालेल्या भाषाविषयक लेखनाचा विचार करून डॉ० माधवी कोल्हटकर, डॉ० कल्पना कुलकर्णी आणि विजया चौधरी यांच्या समितीने कैलास सार्वेकर यांनी लिहिलेल्या 'बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती' (प्रतिभास प्रकाशन, परभणी) या पुस्तकाची निवड केली. पुरस्काराचे वितरण रविवार, दि० २० जानेवारी २०१३ला सायंकाळी ६ वाजता पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन आणि वृत्तपत्रविद्या विभागाचे सभागृह, रानडे इन्स्टिट्यूट, पुणे येथे ज्येष्ठ इतिहासतज्ज्ञ डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांच्या हस्ते झाले.

अतिशय खुसखुशीतपणे केलेल्या आपल्या भाषणात डॉ० देशपांडे यांनी; बोलींमधील बुरूज आणि हुडा (छोटा बुरूज), बासन = कुऱ्हाड, दागिने, स्त्री; 'हिंग' या शब्दाचे असंख्य उपयोग अशा अनेक अर्थवाही शब्दांची उदाहरणे दिली. इराकतमधील 'इर' म्हणजे पाणी आहे आणि हा शब्द इरावती किंवा कावेरी या शब्दांत आपल्याला दिसतो. महाराष्ट्रातील खानदेशी, वऱ्हाडी, मराठवाडी, कोंकणी आदी सर्व बोलींमधील शब्द नीट पाहिले तर या बोली प्राचीन मराठी साहित्याशी इमान राखणाऱ्या आहेत, असे आपल्या लक्षात येते. त्या संदर्भात त्यांनी महानुभाव साहित्य, ज्ञानेश्वरी, एकनाथ-तुकारामांचे अभंग यांचीही उदाहरणे दिली. आज मराठीच्या अध्यापकाचे बोलींमधील

विविध शब्दांच्या अर्थासाठी नेमके प्रबोधन करायला हवे. बोलींमधील विविध शब्दांचे नेमके अर्थ कसे शोधायचे याचे प्रशिक्षण करायला हवे. साहित्यिकाने कथा-कादंबरी लिहिताना प्रदेश आणि भाषा यांचा सूक्ष्म अभ्यास करायला हवा आणि त्यांतील शब्दयोजना जपून करायला हवी. शालेय स्तरावर कठीण कविता अभ्यासायला असतील तर त्याचे सर्व तपशील विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचायला हवे. समाजात स्थलांतरे का होतात आणि मग त्यांचे बोलींवर कसे परिणाम होतात याचाही अभ्यास करायला हवा असेही त्यांनी सांगितले. मात्र बोलींचा अतिरेकी अभिमान नको हे सांगायला ते विसरले नाहीत.

परीक्षकांच्या वतीने बोलताना, डॉ० कल्पना कुलकर्णी यांनी 'बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती' हे पुस्तक कालोचित आहे कारण; आजच्या जागतिकीकरणाच्या काळात, सर्व प्रादेशिक आणि स्थानिक संदर्भ पुसले जात आहेत. त्यामुळे छोट्या भाषा पुसल्या जात आहेत. जेव्हा प्रमाण मराठीचाही संघर्ष सुरू आहे तर बोलींना किती मोठ्या संघर्षाला तोंड द्यावे लागत असेल याची आपल्याला कल्पना येऊ शकेल. त्यामुळेच हे पुस्तक आजच्या काळाला अनुरूप आहे, असे सर्व परीक्षकांचे मत बनले असे त्या म्हणाल्या. पुस्तकाच्या अंतरंगाचा परिचय करून देताना त्यांनी खानदेशातील अहिराणी, लेवा आणि आदिवासी अशा तीनही बोलींचा उत्तम परिचय या ग्रंथात झाला आहे, असे सांगितले. लेखकातील शिक्षकाने आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक न्यूनगंड दूर करण्याच्या दृष्टीने केलेल्या प्रयत्नांचा त्यांनी विशेष उल्लेख केला. एकंदरीत या पुस्तकात बोलीच्या दृष्टीने आवश्यक अशा सर्वच विषयांना स्पर्श केला गेला आहे याकडे त्यांनी उपस्थितांचे लक्ष वेधले.

डॉ० कैलास सार्वेकर यांनी आपण नम्रपणे हा पुरस्कार स्वीकारत असल्याचे सांगून नवापूर महाविद्यालयाचे तत्कालीन प्राचार्य, 'भाषा आणि जीवन'चे संपादक यांनी केलेल्या मार्गदर्शनाचा नेहमीच उपयोग झाला असे सांगितले. लोकसाहित्य आणि ग्रामीण-दलित साहित्य यांच्या अभ्यासालाही बोलींच्या अभ्यासाची मदत होते असा स्वानुभवही त्यांनी कथन केला.

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांनी, अध्यक्षीय समारोपामध्ये, समाजामध्ये भाषिक जागृती खरोखरच होत आहे का याविषयी अद्यापही मनात प्रश्नचिन्ह आहे, असे मत व्यक्त केले. महाबँक पुरस्कार निवड समितीच्या निमंत्रक विजया चौधरी यांनी प्रास्ताविक केले. मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह प्रा० आनन्द काटीकर यांनी सूत्रसंचालन आणि आभारप्रदर्शन केले.

■





अनुक्रमणिका

## १. भाषेच्या बदलाचा अभ्यास गरजेचा

भाषाशास्त्र विभाग, डेक्कन कॉलेज पुणे आणि भारतीय भाषा संस्थान, म्हैसूर यांच्या संयुक्त विद्यमाने 'भारतातील भाषासंपर्क आणि भाषाबदल' या विषयावर ६, ७, ८ फेब्रुवारी या कालावधीत डेक्कन कॉलेज येथे आंतरराष्ट्रीय परिषद आयोजित करण्यात आली. भारतीय भाषा संस्थानचे पुण्यातील पश्चिम विभागीय भाषा केंद्र संस्थेच्या वतीने या परिषदेत सहभागी झाले होते.

सामाजिक भाषाविज्ञानात भाषेत होणारे बदल हा महत्त्वाचा अभ्यास विषय आहे. त्यामुळे जगभरात भाषाविज्ञानातील भाषासंपर्क आणि भाषाबदल या संकल्पनांचा शास्त्रीय अभ्यास होत आला आहे. भारतातील भाषांच्या बदलाची दिशा कोणती असेल याचा अंदाज बांधणे तसेच विशेषत: भारतीय भाषांच्या संदर्भात या संकल्पनांचा अभ्यास किती झाला आहे. या अभ्यासाला किती वाव आहे, यावर विचार करणे याचा उहापोह या परिषदेत झाला. भाषेच्या अशा अभ्यासातून समाजाच्या बदलत्या स्वरूपावर प्रकाश टाकता येतो. या परिषदेत भाषांचे परदेशी अभ्यासकही उपस्थित होते. ■

## २. भाषांतर कार्यशाळा

दि० २९ ते ३१ जानेवारी, २०१३ या कालावधीत, नागपूर येथील वसंतराव नाईक शासकीय समाजविज्ञान संस्था आणि राष्ट्रीय अनुवाद मिशन यांनी संयुक्तपणे भाषांतर कार्यशाळेचे आयोजन केले होते. याप्रसंगी नागपूर विद्यापीठाचे मराठी विभाग प्रमुख प्रा० डॉ० अक्षयकुमार काळे यांनी बीजभाषण केले. श्री० अविनाश पंडित आणि प्रा० डॉ० मधुकर आपटे यांनी अनुक्रमे समाजविज्ञान आणि विज्ञान या विषयांचे भाषांतर कसे करावे यासंबंधी मार्गदर्शन केले. या कार्यशाळेत ६८ जणांनी आपला सहभाग नोंदवला. राष्ट्रीय अनुवाद मिशनच्या समन्वयक अनिता कोरे याप्रसंगी उपस्थित होत्या. ■

## ३. भाषारक्षणासाठी....

इंग्रजी भाषेच्या आक्रमणापासून आपापल्या भाषांचे रक्षण करण्यासाठी जगभरातील अन्य भाषक देशांमध्ये अनेक कार्यक्रम हाती घेण्यात आले आहेत. परंतु कॅनडामधील केबेक राज्याच्या सरकारने तर फ्रेंच भाषेच्या रक्षणासाठी चक्क 'लँग्वेज पोलीस' नेमले आहेत. हे पोलीस आंग्लाळलेल्या 'गुन्हेगारां'ना लगाम घालण्याचे काम करतात. गूस, गॅप, कॉस्टकोसारख्या प्रख्यात कॉर्पोरेट कंपन्यांवर लक्ष ठेवतात आणि वेळोवेळी प्रत्यक्ष घटनास्थळाची तपासणी करतात. सध्या या पोलिसांनी इटालियन हॉटेलांमधील मेन्यूकार्डातून 'पास्ता' हद्दपार करण्यासाठी कंबर कसली होती. या मेन्यूकार्डात इटालियन शब्दांची रेलचेल आहे, असा दावा त्यांनी केला होता. या पोलिसांच्या अहवालानुसार फ्रेंच भाषाविषयक केबेक मंडळाने एका प्रख्यात इटालियन हॉटेलवर कारवाई करण्याचा इशारा दिला. या हॉटेलांच्या वलयांकित ग्राहकांची यादी बोनो, रिहाना, जेरी साइनफिल्ड, लिओनार्डोडिकॅप्रिओपर्यंत लांबलेली आहे. परंतु मंडळाच्या मते या हॉटेलने नियमाचा भंग करून फ्रेंच शब्दांऐवजी पास्ता किंवा बोटिग्लिआसारख्या इटालियन शब्दांचा वापर केला आहे. हॉटेलचा मालक मास्सिमो लेकास याने संतापून आपल्या २,५०० फेसबुक फ्रेंडना मंडळाने पाठवलेले पत्र पोस्ट केले आहे. त्याचा अपेक्षित परिणाम होऊन लेकासयाला सहानुभूती तर मिळालीच; शिवाय पास्तावरील बंदी मागे घेण्यात आली. आंग्लभाषा प्रेमींचा हा विजय मानला गेला, तरी केबेकचे पंतप्रधान पॉलीने मारोइस यांनी 'प्रथम फ्रेंच'चा कायदा करण्यासाठी विधेयक मंजूर केले आहे, हेही विसरता कामा नये. ■

## ४. परदेशात मराठी शाळा

एका मराठी माणसाने चक्क परदेशात, कतारमध्ये मराठी शाळा सुरू करून मराठीचा झेंडा अटकेपार नेला आहे. कोकणचे सुपुत्र हसन चौगुले यांनी मराठीसाठी केलेले हे कार्य महाराष्ट्राला भूषणावह आहे.

रत्नागिरी जिल्ह्यातील खेड बहिरवलीचे सुपुत्र चौगुले गेली ४० वर्षे परदेशात राहतात. त्यांनी मायबोली मराठीच्या प्रचारासाठी परदेशात कतारमध्ये दोन मराठी शाळा सुरू केल्या आहेत. आज त्यांच्या शाळेत १० हजार विद्यार्थी मराठीतून शिक्षण घेत आहेत. मराठी भाषेतून परदेशात शिक्षण मिळण्यासाठी त्यांनी मराठीची पुस्तके परदेशात उपलब्ध करून देण्याचे कामही केले आहे. परदेशात मायभूमीशी नाळ जुळून राहावी या हेतूने मूळ महाराष्ट्रातील सर्वांना त्यांनी एकत्र केले आहे. ■

[ संदर्भ : 'लोकमत', १३ जानेवारी २०१३ ]





अनुक्रमणिका

## ५. अमराठी भाषकांसाठी मराठी अध्यापन कार्यशाळा

अमराठी भाषकांना मराठीचे अध्यापन कसे करावे याचे मार्गदर्शन करणारी कार्यशाळा दि० २१ आणि २२ मार्च, २०१३ या कालावधीत मुंबई विद्यापीठ, मुंबई येथे पार पडली. या कार्यशाळेत प्रा० प्र०ना० परांजपे, डॉ० विभा सुराणा, डॉ० प्रकाश परब, डॉ० विजया देव आदींनी मार्गदर्शन केले. मुंबई विद्यापीठाचा जर्मन विभाग आणि मराठी विभाग यांनी संयुक्तपणे या कार्यशाळेचे आयोजन केले होते.

■

## ६. भारतीय भाषांचे स्थान कायम राहिले

केंद्रीय लोकसेवा आयोगातर्फे काढण्यात आलेल्या इंग्रजी भाषेची सक्ती करणाऱ्या लोकसेवा आयोगाच्या अधिसूचनेनंतर देशभरात असंतोष उसळला. त्यामुळे केंद्र-सरकारने माघार घेऊन पूर्वीप्रमाणे भारतीय राज्यघटनेच्या आठव्या परिशिष्टात नमूद करण्यात आलेल्या कोणत्याही भारतीय भाषेत मुख्य परीक्षा देण्याची परवानगी उमेदवारांना दिली आहे, तसेच सनदी सेवा परीक्षेच्या दुसऱ्या टप्प्यावर नवीन बदलांनुसार द्यावी लागणारी इंग्रजीची १०० गुणांची प्रश्नपत्रिकाही रद्द केली आहे.

■

### तंत्रज्ञानाची पुढची झेप

टेलिफोन कंपन्या अजून दहा-वीस वर्षांच्या आत अशी एक तांत्रिक व स्वयंचलित सेवा देतील, की वेगवेगळ्या भाषा बोलणारे लोक त्या सेवेच्या माध्यमातून आपापल्या भाषांमध्ये बोलू शकतील व सतरांनाही त्यांच्या-त्यांच्या भाषांमध्ये त्याच वेळी आपोआप भाषांतरित होऊन ऐकू येऊ शकेल. ह्याला 'रिअल टाइम व्हाइस/लँग्वेज ट्रान्सलेशन टेक्नॉलॉजी' असं संबोधलं जातं. माहिती तंत्रज्ञानाच्या साहाय्यानं आपोआप आणि प्रचंड वेगानं सध्या होत असलेल्या संगणक किंवा मोबाईल फोनवरील लिखित मजकुराच्या लिप्यंतराच्या (transliteration) आणि भाषांतराच्या (translation) फार फार पुढची ही झेप आहे.

विवेक सावंत, महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, जानेवारी-मार्च २०१३



अनुक्रमणिका

## बोली-विशेषांकाविषयी

'भाषा आणि जीवन'चा दिवाळी बोली-विशेषांक म्हणून आपण प्रसिद्ध केला आहे. 'बोलींच्या अभ्यासाचे महत्त्व' या संपादकीयात मांडलेल्या विचार-सूत्रानुसार आपण अंकातील लेखांची निवड आणि आखणी केली आहे.

वस्तुतः प्रमाणभाषेला साहाय्यभूत असलेल्या बोलींची, त्यांचा अभ्यासाची उपेक्षा करणे योग्य नाही, याचे भान प्रस्तुत अंकाने नक्कीच येईल.

**वि०शं० चौघुले**

ए/5, ॐ विजयश्री सहनिवास, संत जनाबाई पथ, विले पार्ले (पूर्व), मुंबई 400 057.
स्थिरभाष : (022) 2613 3660

■



## अंक हिवाळा २०१३

संदर्भ : डॉ० मृणालिनी शहा याचे संपादकीय

नुकताच 'भाषा आणि जीवन'चा हिवाळा २०१३चा अंक हाती आला. 'बोली आणि बालभारती' हा संपादकीय लेख वाचला. लेखिकेने बोली भाषांविषयी जे मत मांडलं आहे ते 'बोली भाषा स्वीकारायला हव्यात' ह्या नव्या प्रवाहाशी सुसंगत आहे. लेखात 'खेड्यापाड्यांतील प्राथमिक शिक्षणाची दुरवस्था आपण सर्वजण जाणत असतोच' हे वाक्य सर्वमान्य सत्य असल्यासारखे वापरले आहे. क्षमा करा; परंतु खेड्यापाड्यातील शिक्षणाचा जवळून कोणताही अनुभव नसताना असे विधान करणे सन्माननीय व्यक्तींना शोभत नाही. आज महाराष्ट्रात सर्वच क्षेत्रांत अग्रेसर मुलांत खेड्यातीलच मुले अग्रेसर आहेत. ती कुठं शिकली? खेड्यांत अभावात जगणारी आणि शिकणारी ही मुलं शहरांतील मुलांना टक्कर देऊ पाहताहेत ते कशाच्या जोरावर?

मी स्वतः शिक्षक आहे. गेली नऊ वर्षे लीलाताई पाटील, मंजूताई निमकर इ०च्या मदतीने नवीन प्रवाह मुलांपर्यंत पोचवतो आहे. काही सर्वेक्षणाच्या फसव्या आकड्यांनी आपण आपलं मत बनवू नये. खेड्यात या. परिस्थिती स्वतः पाहा, मग विधान करा. आदिवासी लोकांना त्यांचा हक्क आपण मिळूच दिला नाही. आता मात्र सगळेच बोली भाषांविषयी कळवळ्याने बोलत आहेत. हे शाब्दिक चकवे थांबवून समस्या जाणून उपाय शोधूया. ते अधिक फायदेशीर ठरेल असे वाटते. अधिक उणे क्षमस्व. कळावे.

**फारुक स० काझी**

नाझरा, ता० सांगोला, जि० सोलापूर 413 308

■

## लेखक-परिचय


- **करंदीकर,** सुमन प्रभाकर : एम०ए०,एम०एड०,पीएच०डी०, २८ वर्षे महाविद्यालयीन अध्यापन-अनुभव. प्रशासन संचालक, राज्य संसाधन केंद्र, महाराष्ट्र भारतीय शिक्षण संस्था, पुणे. संचालक, सेंटर फॉर एज्युकेशनल स्टडीज भारतीय शिक्षण संस्था, पुणे. प्राथमिक व उच्च शिक्षण सार्वत्रिक व्हावे म्हणून 'PROPEL' या क्षेत्रीय संशोधनाच्या सहसंचालक. अनेक सर्वेक्षणे, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर साक्षरतेविषयक निबंध सादर. 'आपणच' या स्वयंसेवी संस्थेच्या निर्मितीत सहभाग व त्याच्या अध्यक्ष. काही पुस्तके व पुस्तिकांचे लेखन. टपाल-पत्ता : 47/731, लोकमान्यनगर, पुणे 411 030.
  चलभाष : 98605 02587, ई-पत्ता : suman.karandikar@gmail.com
- **काटीकर,** आनन्द : एम०ए० (मराठी), औषधनिर्माणशास्त्राची पदविका, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे अध्यापन.
  टपाल-पत्ता : एफ 301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सनसिटी रस्ता, आनंदनगर, सिंहगड रस्त्यालगत,पुणे 411 051. स्थिरभाष : (020)2535 6609,
  चलभाष : 094216 10704, ई-पत्ता : anand.katikar@gmail.com
- **काटीकर,** जयश्री आनंद : एम०ए० (मराठी), 'मॅकमिलन इंडिया'मध्ये काही वर्षे संपादक . ज्ञानप्रबोधिनीच्या 'छात्रप्रबोधन' मासिकाच्या संपादनात काही वर्षे सहभाग. सध्या अक्षरनंदन शाळेत अध्यापन.
  टपाल-पत्ता : एफ 301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सनसिटी रस्ता, आनंदनगर, सिंहगड रस्त्यालगत, पुणे 411 051.
- **काळे,** रावसाहेब मुरलीधर : एम०ए०,पीएच०डी०, 'समकालीन ग्रामीण साहित्य' डॉ० विठ्ठल वाघ गौरवग्रंथाचे संपादन. वऱ्हाडी बोली संशोधन केंद्र (लोणी)चे अध्यक्ष. टपाल-पत्ता : मु० लोणी, पो० रिधोरा, ता० बाळापूर, जि० अकोला 443 002.
  चलभाष : 099231 93262, ई-पत्ता : raosaheb_kale@rediffmail.com
- **चांगण,** कोकिळा हणमंत : एम०ए०(मराठी), कडेगाव येथील कन्या महाविद्यालयातील राष्ट्रीय चर्चासत्रात शोधनिबंध सादर.
  टपाल-पत्ता : मु०पो० दुधेबावी, ता० फलटण, जि० सातारा 415 523.
  स्थिरभाष : (02166)221728, चलभाष : 94238 63726.
  ई-पत्ता : jgd.kokila2@yahoo.in
- **चौधरी,** विजया : एम०ए०, निवृत्त बँक अधिकारी. 'स्त्री साहित्याचा मागोवा' (खंड ३) व 'भारतीय भाषांतील स्त्री साहित्याचा मागोवा' या प्रकल्पांमध्ये संशोधन सहकार्य.
  टपाल-पत्ता : इ-503, गार्डन व्ह्यू, पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे 411 030.
  स्थिरभाष : (020)2425 0559, चलभाष : 099236 71820.
  ई-पत्ता : vijayachaudhri@gmail.com






अनुक्रमणिका

**देशपांडे,** व०सी०: शिक्षणशास्त्र महाविद्यालयात अनेक वर्षे अध्यापकाचार्य. १९९० ते ९८मध्ये संचालक. शिक्षणाभ्यास केंद्र, इंडियन इन्स्टिट्युट ऑफ एज्युकेशन. पुणे विद्यापीठात शिक्षणशास्त्रविद्याशाखेचे अधिष्ठाता. राष्ट्रीय पातळीवर एन०सी०ई० आर०टी०मध्ये तज्ज्ञ म्हणून सहभाग. चीन व जपान येथील चर्चासत्रांत सहभाग. राज्याच्या डी०एड० अभ्यासक्रमनिर्मितीत सहभाग. 'सूक्ष्म अध्यापन', 'प्रशिक्षणतंत्र', 'भारतीय शिक्षण आणि समाज' आदी अनेक पुस्तके प्रकाशित.

टपाल-पत्ता : ए-2/5, गजेंद्रनगर, दत्तवाडी. पुणे 411 030.

स्थिरभाष : (020)2433 6302, चलभाष : 98811 45538

**धडफळे,** मो०गो० : फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे ३८ वर्षे संस्कृत व पाली भाषांचे अध्यापन. टिळक महाराष्ट्र विद्यापीठात युरोभारतीय भाषाविज्ञानाचे अध्यापन. अनेक इंग्रजी ग्रंथ प्रकाशित तसेच 'साहित्य सावित्री', 'पालिबौद्ध संतसाहित्य'. 'धर्मानंद कोसंबी : पालि-बौद्ध धर्माचे भाष्यकार' आदी अनेक मराठी पुस्तके प्रकाशित. इराण शासनातर्फे इराण भाषातज्ज्ञ म्हणून तसेच जम्मूकश्मीर विद्यापीठातर्फे मंजुश्री पुरस्कार देऊन गौरव.

टपाल-पत्ता : 2 'यशोदीप-ब',रामबाग वसाहत, सदाशिव पेठ, पुणे 411 030.

स्थिरभाष : (020)2433 2081

**पाध्ये,** विजय : पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८-पासून विविध उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तऐवजांचे इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याचे काम स्वतंत्रपणे करतात.

टपाल पत्ता : 4 चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी. बिबवेवाडी, पुणे 411 037.

स्थिरभाष : (020)2441 1951,चलभाष : 098220 31963

ई-पत्ता : V.wordsmith@gmail.com

**मुंडले,** आशा : एम०ए०(भाषाविज्ञान व समाजशास्त्र), १९६२ ते १९६६ मध्ये शिकागो विद्यापीठाच्या मुंडा प्रकल्पात संशोधन अधिकारी व मानववंशशास्त्र विभागात विद्यार्थी. काही वर्षे राष्ट्रीय शिक्षण संशोधन व प्रशिक्षण मंडळात अधिव्याख्याता. म० फुले यांच्या 'शेतकऱ्याचा आसूड'चे इंग्रजीत भाषांतर. 'घर', 'अशी आहे मराठी' इत्यादी पुस्तके प्रकाशित. अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन.

टपाल-पत्ता : 'मनश्री', 163/16,डी०पी० रस्ता, औंध, पुणे 411 007.

स्थिरभाष : (020)2588 1099

**राईलकर,** मनोहर : एम०एस०सी० ( सांख्यिकी ), एम०एस०सी० ( गणित ), स०प० महाविद्यालय, पुणे येथे ३४ वर्षे गणिताचे अध्यापक व विभाग प्रमुख. गणित विषयावरील २३ पुस्तके, तीन कादंबऱ्या, सात विज्ञानकथा आदी लेखन.

टपाल-पत्ता : 'मृण्मयी', जेधेनगर, बिबवेवाडी, पुणे 411 037

स्थिरभाष : (020) 2422 0566 ; चलभाष : 0984220 67619

ई-पत्ता : railkar.m@gmail.com

BOOK PACKET Containing Periodical

बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक

आर०एन०आय० नोंदणी क्र० Q-4004 ४/८३

ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parishad Patrika

मूल्य ₹ ४०/-

दिनविशेष:
१ मे
महाराष्ट्र दिन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका



वर्ष ३१। अंक २। उन्हाळा २०१३

प्रेषक:
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
1, शीतल अपार्टमेंट्स,
46/4 एरंडवणे,
पुणे 411 004.





